श्री ळकंठ धुंडीराज धर्माधिकारी
श्रीगोपालकृष्णाय नमः
मुक्तापी

# अथ सिंदुरागिरिमाहात्म्य,

अथवा

# रामटेकवर्णन.

## ॥ श्री गजानन ॥ सिंदूर (रामटेक) पर्वताचें माहात्म्य ॥

कोणे एके समयीं कैलास पर्वतावर पार्वती सहित शंकर सुखासनावर बसलेअसतां पार्वती शंकरा प्रत ह्मणते पति महारा_
ज मीं आपल्या पासूनपर्वत आदिकरून नाना प्रकारचीं रमणीय स्थानें, प्रसिध्द तीर्थें, अरण्यें, १ तडाग, कुंडें, कूप,वापिका,
झरे ह्याविषयीं आपल्या प्रसादानें श्रवण केलें २ परंतु जें कदली (केळींच्या) वनांतील अत्यंत गुप्त स्थल ज्याच्याविषयीं मीं

॥ श्रीगणेशायनम: ॥ अथसिंदूराद्रिमाहात्म्यंलिख्यते ॥ पार्वत्युवाच ॥ पर्वतादीनि
रम्याणिस्थानानिविविधानिच ॥ तीर्थानिदेवख्यातानिअरण्यानिचतानिच ॥ १ ॥
तडागानिचकुंडानिकूपाश्चवापिकास्तथा ॥ निर्झराणिचसर्वाणिश्रुतानित्वत्प्रसादत:
॥ २ ॥ स्वामिंस्त्वयानतत्प्रोक्तंगुप्तंयत्कदलीवने ॥ द्वित्रिवारंकृत:प्रश्नोमयातेत्रिपुरांतक
॥ ३ ॥ नचेत्कथयसेदेवयास्यामिहिमवद्गृहं ॥ श्रुत्वातद्वचनंशंभु:प्रहस्योत्फुल्ललो-
चन: ॥ ४ ॥ पार्वतींप्रत्युवाचाथतस्यामुद्युक्तमानस: ॥ ईश्वर० ॥ इदानींसंप्रवक्ष्या
मियद्गोप्यंतेमयाकृतं ॥ ५ ॥ नकथयेदंकुमारस्यअसौयास्यतितत्रवै ॥ रमणीयंमहा-

दोन तीन वेळ आपणांस विचारिलें त्याविषईं आपण अझून मला सांगितलें नाहीं. ३ हे त्रिपुरांतक तें स्थल जर मला न
सांगाल तर पहा ही मी हिमवान् पर्वताच्या ( आपल्या बापाच्या ) घरीं निघाल्यें. हें प्रियेचें भाषण ऐकून शिव हास्यक-
रून ४ प्रीतीनें पार्वतीप्रत बोलतात. प्रिये जें इतर कोणास सांगण्याजोगें नव्हतें तें माझें कृत्य मी तुला आतां सविस्तर
सांगतों ५ परंतु तें आपल्या षडाननाला सांगू नको, कारण हे महाभागे त्या पर्वता सारखें दुसरें रमणीयस्थल कोठेंच नाहीं

ह्मणून तो त्या ठिकाणीं खचितच जाईल. ६ कैलास, वैकुंठ, हिमालय, मंदर ( या पर्वतावर शंकर कधीं कधीं रहातात ) विंध्य, सह्याद्रि, मेरु हे महापर्वतही त्या सारखे रमणीय नाहींत. ७ ह्या पर्वतांवर जें जप, तप, दान, हवनादि पुण्यकर्म करतात तें ह्या पर्वतावर केलेल्या जपादिकांच्या षोडशांशाही बरोबर नाहीं ८ असें शिवाचें भाषण ऐकून गौरी मोठ्या त्वरेनें शिवाला प्रदक्षिणा घालून व नमस्कार करून आदर पूर्वक उत्कंठेनें भाषण करती झाली. ९

भागेतत्समंनास्तिकुत्रचित् ॥ ६ ॥ नकैलासोनवैकुंठोनाहिमोमंदरोऽपिवा ॥ विंध्यश्च सहजोऽप्यद्रिर्नमेरुस्तेनभातिमे ॥ ७ ॥ गिरिष्वेतेषुयत्तप्तंजप्तंदत्तंहुतंचयत् ॥ तपंगिरिमनुप्राप्यकलांनार्हतिषोडशीं ॥ ८ ॥ श्रुत्वातत्संभ्रमेणैवगौरीप्रोवाचसादरं ॥ कृत्वाप्रदक्षिणंपादौमूर्ध्नाजग्राहसादरं ॥ ९ ॥ पार्वत्यु ०॥ नकथयेऽहंमहादेवकुमारस्यात्मजस्यच ॥ शपथेगिरिराजस्यमेनकायागुहस्यच ॥ १० ॥ अर्धासनेततःशंभुरुपविष्टां मनस्विनीं ॥ तामुवाचसमालिंग्यगिरेर्माहात्म्यमुत्तमम् ॥ ११ ॥ इश्वरउ ०॥ श्रृणु देविपरंगुह्यगुह्याद्गुह्यतरंपरं ॥ तपंगिरेस्तुमाहात्म्यंकर्णेदत्वासुमध्यमे ॥ १२ ॥ विंध्य-

हे महादेवा, माझे मातापितर जे मेनका, आणि हिमाचल त्यांची व आपला पुत्र स्कंद यांची शपथ वाहून मी आपल्याला सांगतें कीं, आपण जें मला सांगाल, तें आपल्या षडाननाला न सांगतां मी गुप्त ठेवीन १० हें तिचें भाषण ऐकतांच प्रीतीनें तिला आपल्या अर्धासनीं बसवून दृढ आलिंगन देऊन शंकर पार्वतीला ह्या पर्वताचें माहात्म्य सांगूं लागले ११ हे सुंदरि, त्या तपंगिरीचें माहात्म्य अति गुह्य आहे तें तूं कान देऊन ऐक १२ विंध्य पर्वताच्या दक्षिण भागीं सिंदूर–नांवाचा पर्वत

आहे, त्याच्या केवळ दर्शनानें ब्रह्महत्यादि पातकें नाश पावतात. १३ जों पर्यंत तो तपोमूर्ती सिंदूर पर्वत लोकांनीं पाहिला नाहीं तों पर्यंतच विंध्य, श्री शैल, मंदर ह्या पर्वतांची प्रतिष्ठा आहे १४ गो हत्या, ब्रह्म हत्या, बालहत्या, सुरापान इत्यादि महापातकें करणारेही त्या राम पर्वताच्या दर्शनानेंच सत्यलोकीं जातात. १५ कलियुगांत अवंती, गोमती, कांची, काशी, मथुरा हीं पुण्य नगरें राम पर्वताच्या षोडशांशाची बरोबरी पावत नाहात. १६ हरिद्वार, गया, गंगा, पुष्कर

स्यदक्षिणेभागेसिंदूरोनामपर्वत: ॥ तस्यदर्शनमात्रेणब्रह्महत्याव्यपोह्यते ॥ १३ ॥
तावद्विराजतेविंध्य:श्रीशैलोमंदरोपिवा ॥ यावन्नदृश्यतेलोकै:सिंदूराद्रिस्तपोमय: ॥१४
गोघातीबालघातीवासुरापीब्रह्महापिवा ॥ सयातिसत्यलोकंवैरामशैलस्यदर्शनात् ॥१५॥
अवंतिगोमतीकांचीकाशिकामथुरापुरी ॥ कलौस्थितस्यरामाद्रे:कलांनार्हंतिषोडशीं १६
हरिक्षेत्रगयागंगापुष्करपुरुषोत्तम- ॥ -कुरुक्षेत्रेषुसंवास:कलांनार्हंतिषोडशीं ॥ १७ ॥
कोटिवर्षतपस्तस्वायत्फलंहिमवद्गिरौ ॥ तत्फलंप्रहरार्ध्देनसिंदूरेवसत:कलौ ॥ १८ ॥
तत्रयेमानवालोकेकलौनित्यंवसंतिच ॥ तेषांगतिर्वरारोहेयोगिनांयाभविष्यति ॥ १९ ॥

पुरुषोत्तम क्षेत्र, कुरुक्षेत्र ह्या पुण्य क्षेत्रांत केलेला वास त्या पर्वत वासाच्या षोडशांशाची योग्यता पावत नाहीं. १७ कलियुगांत एक कोटि वर्षें पर्यंत हिमवान् पर्वतावर तप करून जें फलप्राप्त होतें तें फल सिंदूर पर्वतावर अर्धे प्रहर वास केल्यानें प्राप्त होतें. १८ हे सुंदरि, कलियुगांत त्या पर्वतावर जे मनुष्य नित्य वास करितात त्यांस, योग्यांची गति प्राप्त होते. १९ सिंदूर पर्वतावरील रामचंद्राचें जे एकादशीचे दिवशीं दर्शन करितील त्यांस स्वर्ग आणि मोक्ष प्राप्त

होतील यांत संशय नाहीं. २० त्या ठिकाणीं एकादशीचे दिवशीं मौन धारण करून जो विष्णु सहस्र नामाचा जप करतो अथवा 'राम' ह्या नामांचाच जप करतो त्याला मोक्ष प्राप्त होतो यांत संदेह नाहीं २१ जे त्या दिवशीं रामाच्या संनिध जागरण करितात ते पुष्पक विमानांत बसून विष्णुलोकीं जातात. २२ ज्यांस कलियुगांत राम यात्रा घडते ते सर्व दुःखांपासून मुक्त होतात आणि तेच धन्य होत. २३ इतर क्षेत्रीं कोटि ब्राह्मण भोजनाचें जें फल तें ह्या सिंदूर पर्वतावर

सिंदूराद्रिस्थितंरामंयःपश्यतिहरेर्दिने ॥ तस्यस्वर्गश्चमोक्षश्चसत्यंसत्यंममोदितं ॥ २० ॥
मौनेनतद्दिनेस्थित्वाजप्त्वानामसहस्रकं ॥ अथवारामरामेतिमोक्षंयांतिनसंशयः ॥ २१ ॥
येकुर्वंतिनरास्तत्रजागरंरामसन्निधौ ॥ पुष्पकेणविमानेनयांतितेविष्णुमंदिरं ॥ २२ ॥
धन्यास्तेमानवालोकेयेषांसंजायतेकलौ ॥ रामयात्राप्रसंगोऽयंसर्वेतेविगतज्वराः ॥ २३ ॥
द्विजानांदेविविदुषांकोटिंसंभोज्ययत्फलं ॥ एकमेवद्विजंभोज्यसिंदूरेतत्समंफलं ॥ २४ ॥
निदाघकालेपानीयंयोददातिनरोत्तमः ॥ वितृषंकुरुतेविप्रंगयातुल्यंफलंलभेत् ॥ २५ ॥
सहस्रभोजनंयेवैतत्रकुर्वंतिमानवाः ॥ तेषांपुण्यमसंख्यातंमयावक्तुंनशक्यते ॥ २६ ॥

एका ब्राह्मणास भोजन घातल्यानें प्राप्त होतें. २४ येथें ग्रीष्म ऋतूंत शीतल उदकानें ब्राह्मणांची तृषा जो दूर करितो त्यास गया श्राध्दाचें फल प्राप्त होतें. २५ ह्या पर्वतावर जे सहस्र भोजन घालतात त्यांचे पुण्याची गणना करावयास मी समर्थ नाहीं. २६ अन्य क्षेत्रांत सहस्र भोजनानें जें फल मिळतें तें फल ह्या पर्वतावर अतिथ्याला भिक्षा दिल्यानें प्राप्त होतें. २७ पार्वती प्रश्न करिते—प्राणनाथ एकदां ह्या पर्वताचें तपंगिरि असें नाम आपण सांगीतलें आणि एकदा सिंदूर पर्वत

असें नाम सांगतां २८ तर हीं दोन नामें त्या पर्वताला कां प्राप्त झालीं हें हे गजांतका मला सांगा. शिव सांगतात, हे देवेश्वरि पुर्वी नृसिहरूप विष्णूनें हिरण्य कशिपूचा देह विदारण केला २९ आणि तो ह्या पर्वतावर टाकिला त्याच्या रक्तानें हा सिंदूरा सारखा दिसूं लागला. ३० तेव्हां पासून सिंदूर पर्वत असें त्यास नाम प्राप्त झालें. ज्याला चार द्वारें आहेत

सहस्रभोजनंकृत्वाअन्यक्षेत्रेतुयत्फलं ॥ भिक्षामात्रप्रदानेनसिंदूरेतत्समंफलं ॥ २७ ॥ पार्वत्युवाच ॥ नामद्वयंकथंतस्यसुरम्यस्यतपंगिरे: ॥ पूर्वंतपंगिरिर्नामद्वितीयंसिंदुराचल: ॥ २८ ॥ द्विनामाकेनसंजातस्तन्मेब्रूहिगजांतक ॥ ईश्वर०॥ हिरण्यकशिपोर्देह:पीडितोविष्णुनापुरा ॥ २९ ॥ रक्तेनतेनसर्वेशेभेदितोमृच्छिलामय: ॥ सिंदूरसदृशोजातस्तेनसिंदूरपर्वत: ॥ ३० ॥ सिंदूरगिरिनामायंततोख्यातिंगतोभुवि ॥ चतुर्द्वारंसुधाकारंयोजनायुतमुच्छ्रितं ॥ ३१ ॥ तद्दृष्ट्वागिरिराजंवैतन्मेनिगदत:शृणु ॥ ३२ ॥ इतिश्रीपद्मपुराणेसिंदूरगिरिमाहात्म्येप्रथमोऽध्याऽय: ॥

ज्याचा आकार केवळ अमृतरूप आहे, ज्याचा विस्तार एक योजन ( चार कोस ) आहे. जो अतिशय उंच आहे. ३१ त्याच्या दर्शनाचें फल मी तुला सांगतों तें श्रवण कर. ३२ ॥ इतिश्रीपद्मपुराणे सिंदूरगिरिमाहात्म्ये प्रथमोध्याय: समाप्त: ॥ १ ॥

शंकर सांगतात हे देवि त्या पर्वताच्या पूर्वभागीं घंटेश, दक्षिणभागीं सिध्देश, पश्चिमभागीं केदार, आणि उत्तरभागीं हनुमान् हे देव वास करितात, १ प्रथमतः पूर्वभागीं सूर्य नदी आहे तिचें स्नान करून सुरदेवीचें पूजन करून भक्तीनें घंटेशाची पूजा करावी, ह्मणजे स्वर्ग लोकीं वास घडतो. २ देवग्राम, देवनदी, आणि साक्षात् रामचंद्र देव असा देवांचा संयोग फारच दुर्लभ होय ३ नंतर दक्षिणद्वारीं जाऊन मोक्षकुंडांत स्नानकरून मोक्षजा ह्या नांवाच्या देवीची भक्तीनें पूजाकरून

॥ इश्वर०॥ घंटेश:पूर्वदिग्भागेसिद्धेशोदक्षिणेस्मृत: ॥ केदार:पश्चिमेदेविहनुमानुत्तरे स्थित: ॥ १ ॥ पूर्वेस्नात्वासूर्यनद्यांसुरदेवींसमर्चयेत् ॥ घंटेशंपूजयेद्भक्त्यानरोयाति सुरालयं ॥ २ ॥ देवग्रामेदेवनदीदेवोदेवेतिसंयुतं ॥ संकेतोयंमहाभागेनलभ्योयत्रकु-त्रचित् ॥ ३ ॥ दक्षिणेद्वारमाद्यंचमोक्षकुंडेनिमज्यच ॥ मोक्षजामर्चयेद्भक्त्यासिद्धेशं-सादरंनमेत् ॥ ४ ॥ कामगेनविमानेननरोयात्यप्सरान्वित: ॥ मोक्षंचजायतेयस्मात् तस्मात्सामोक्षजास्मृता ॥ ५ ॥ ततोव्रजेत्पुनर्द्वारंकेदारोयत्रतिष्ठति ॥ मणिकालेनर: स्नात्वाहेडिंबामर्चयेत्सुधी: ॥ ६ ॥ केदारंभीमनाथंचश्रीराममंमणिकेश्वरं ॥ गंधपुष्पादि

आदरपूवक सिध्देशाची पूजा करावी. ४ ह्मणजे तो मनुष्य इच्छाचारी विमानांत बसून अप्सरां सहवर्तमान सुख भोगितो. ती देवी मोक्ष देते ह्मणून तिला मोक्षजा हें नाम प्राप्त झालें आहे ५ नंतर पश्चिमभागीं केदार ज्या ठिकाणीं आहे त्या ठिकाणीं जावें आणि मणिकाल कुंडावर स्नान करून हेडिंबा नांवाच्या देवीची शहाण्या पुरुषानें पूजा करावी. ६ आणि केदार, भीमनाथ, श्रीराम, आणि मणिकेश्वर यांची गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य इत्यादि मनोरम उपचारांनीं पूजा करावी ७

ह्याप्रमाणें भक्तीनें जो पूजा करितो तो चौदा इंद्र होईपर्यंत स्वर्गी वास करितो. ८ नंतर उत्तरद्वारी जाऊन तेथील सरोवरी स्नानकरून हनूमंताचें दर्शन करतो ता पुष्पक विमानांत बसून स्वर्गी जातो ९ ज्याला विषबाधा झाली असेल, जो पिशाच ग्रस्त झाला असेल, ज्याला शाकिनी देवीची पीडा झाली असेल किंवा ज्याला एक, दोन, किंवा चार दिवसांच्या अंतरानें किंवा निरंतर ज्वर येत असेल १० तो हनुमत्कुंडाच्या स्नानानें सर्व पीडांपासून मुक्त होतो. सुगंध पुष्पांच्यामाल

**नैवेद्यैर्धूपदीपैर्मनोहरैः ॥ ७ ॥ अनेनैवप्रकारेणयःकुर्यात्पूजनंनरः ॥ पुरंदरपुरेतिष्ठे द्यावदिंद्राश्चतुर्दश ॥ ८ ॥ उत्तरद्वारमासाद्यमग्नस्तस्मिन्सरोवरे ॥ सनरःपुष्पगामीवे यःपश्यतिहरीश्वरं ॥ ९ ॥ विषग्रस्तंपिशाचंवाशाकिन्युपहतंजडं ॥ एकाहिकंद्व्या हिकंवाचातुर्थंसंततज्वरं ॥ १० ॥ हनूमान्स्नानतःपुण्यंसर्वदोषानपाहरेत् ॥ सुगंधि पुष्पमालाभिरनुलिंप्यसुचंदनैः ॥ ११ ॥ भक्ष्यभोज्यान्नपानैश्चफलैःकालोद्भवैस्तथा ॥ संतर्प्यविविधैर्भोगैःप्रणिपत्यक्षमापयेत् ॥ १२ ॥ विमानैःकांचनप्रख्यैर्मुक्ताहारविलंबितैः ॥ नीयतेरुद्रलोकेचस्तूयमानोप्सरोगणैः ॥१३॥ रुद्रलोकेवसेत्तावद्यावत्कल्पः**

व उत्तम चंदन यांनीं हनुमंताची पूजा करून ११ अनेक प्रकारच्या भक्ष्य भोज्य अन्नाचा आणि त्या ऋतूंत उत्पन्न होणाऱ्या पदार्थांचा नैवेद्य अर्पण करावा आणि साष्टांग नमस्कार करून आपल्या अपराधांची क्षमा मागावी १२ ह्मणजे मौक्तिकांच्या झालरी ज्यांस शोभत आहेत अशा सोन्याच्या विमानांत बसवून त्याची स्तुति करीत अप्सरा त्यास रुद्रलोकीं नेतात १३ आणि नंतर तो तेथें आकल्प वास करितो. हें श्रवण करून पुनः ती महाभागा ( अतिसद्गुणी) गौरी आदर

युक्त प्रश्न करिती झाली. १४ हे शंकरा जर मी तुह्माला खरेंच आवडतें तर कलिपा आणि सुरनदी ह्या दोन नद्यांचें कलिभय नाशक असे जें माहात्म्य तें मला सांगा. १५ शंकर सांगतात, हे महाभागे कलिपा आणि सुरनदी ह्यांचा ज्या ठिकाणीं संगम झाला आहे तें सर्व पातकांचा नाश करणारें तीर्थ आहे असें जाण १६ त्या संगमावर भाद्रपद शुक्ल त्रयोदशीचे दिवशीं दंपत्यानें एक वस्त्रानें आपणाला वेष्टन करून कलिपा नदींत स्त्री, आणि देवनदींत पुरुष असें राहून

समाप्यते ॥ श्रुत्वैतच्चमहाभागागौरीप्रोवाचसादरं ॥ १४ ॥ गौर्युवाच ॥ कलिपासुर
नद्योस्तुमाहात्म्यंकलिनाशनं ॥ कथयाशुमहाभागयद्यहंतववल्लभा ॥१५॥ ईश्वर०॥
कलिपासुरनद्योस्तुसंगमोयत्रजायते ॥ जानीहितन्महाभागेतीर्थमलविनाशनं ॥१६॥
सुस्नातौदंपतीतत्रनभस्यस्यत्रयोदश्यां॥कलिपायांस्थितापत्नीदेवनद्यांस्थित:पुमान १७
एकवस्त्रेणतौवेष्ट्यनिमज्योन्मज्यनिर्गमेत्।एकएवपरार्थोपितथास्नात्वाविनिर्गमेत्१८
मौनंधृत्वाथसंपूज्यघंटेशंसुरदेवयो: ॥ ततोव्रजेत्पुनस्तत्रयत्रतिष्ठतिराघव: ॥ १९ ॥
मौनेनपश्येद्देवेशंश्रियायुक्तंरघूत्तमं ॥ इदमुच्चारयेद्वाक्यंदंपतीपुरत:स्थितौ ॥ २० ॥

यथेच्छ स्नान करावें—व दंपत्या पैकीं एकच असला तर त्यानें आपण स्नान करून दुसऱ्या बद्दलही स्नान करावें—आणि नंतर बाहेर यावें १७,१८ आणि संगमावरील घंटेशाची मौनधारण करून पूजा करावी नंतर मौन न सोडतां राम मंदिरांत जाऊन १९ सीतारामाचें दर्शन घ्यावें आणि अग्रभागीं अंजली जोडून जोडप्यानेंच नम्र होऊन प्रार्थना करावी कीं २० कलिपा आणि सुरनदी यांच्या संगमावर स्नान करून आह्मीं घंटशाचें दिव्यरीतानें पूजन केलें २१

आणि सीता युक्त जो तूं त्या तुझें दर्शन घेतलें. तेव्हां, देहानें, वाणीनें, किंवा मनानें जें पातक केलें असेल २२ त्यापासून आह्माला मुक्त कर आणि कलिवास न होईल असें कर. ह्याप्रमाणें प्रार्थना झाल्यानंतर उपोषणाचा संकल्प करून उपोषण

कलिपासुरनद्योस्तुसंगमोयत्रतिष्ठति ॥ तत्रस्नात्वामयादेवघंटेशोदिव्ययार्चित:॥२१॥
मयादृष्टोसिदेवेशससीतोरघुनंदन: ॥ कर्मणामनसावाचायत्पापंसंचितंमया ॥ २२ ॥
नाशयस्वश्रियायुक्तोमुक्तंमांत्वंकले:कुरु ॥ संकल्पस्तत्रकर्तव्योउपोषणपरायण: ॥२३॥
जागरंतत्रकर्तव्यंदीपदानंचकारयेत् ॥ भोजयेद्ब्राह्मणान्प्रात:शर्कराघृतपायसै: ॥२४॥
सीतारामायसंकल्पंलक्ष्मणायपरायच ॥ परिवारायरामस्यस्नानवस्त्रादिपूर्वकं ॥२५॥

करावें. २३ रात्रौ श्री सीताराम प्रीत्यर्थ जागर करावाआणि देवाच्या अग्रभागीं दीप लावावा. दुसरे दिवशीं प्रात:कालीं ब्राह्मणांनां शर्कराघृत दुग्ध इत्यादि युक्त असें भोजन घालावें २४ आणि सीता, राम, लक्ष्मण, व त्यांचा इतर परिवार ह्यां प्रीत्यर्थ ब्राह्मणांस स्नान घालून वस्त्रादि दानें द्यावीं. २५ हे देवि ह्या प्रमाणें कलियुगांत जो आचरण करील त्याचीं

पूर्वजन्मींचीं सर्व पातकें नाश पावतात २६ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, इतर हीन जातीय लोक स्त्री किंवा पुरुष, गरीब किंवा श्रीमंत, गृहस्थ किंवा योगी कोणीही असो भाद्रपद शुक्ल त्रयोदशीचे दिवशीं जर त्या संगमावर स्नान करील तर

अनेनविधिनादेविय:करोतिकलौनर: ॥अन्यजन्मकृतंपापंतत्क्षणात्तस्यनश्यति ॥२६॥
ब्राह्मणा:क्षत्रियावैश्या:शूद्रा:स्त्रीपुंबालोमजा॥तत्रार्थहीनोयतिश्चेद्दर:प्राप्यकलेर्दिनं २७
तवस्नेहान्मयाख्यातंसत्यमेतन्नसंशय: ॥ नास्तिकायाप्यभक्तायानिंदकायनकथ्यते ॥२८
इतिश्रीपद्मपु०द्वितीयोध्याय:समाप्त:॥छ छ छ छ छ छ

तो सर्व पातकांपासून मुक्त होईल यांत संशय नाहीं. २७ प्रिये हें तुझ्या प्रीतीमुळें मी तुला सांगीतलें हें नास्तिकाला किंवा भक्तिहीनाला कधींही सांगू नये ॥ २८ ॥ इति श्री पद्मपुराणे सिंदूरागिरि माहात्म्ये द्वितीयोध्यायः समाप्तः ॥

पार्वती प्रश्न करिते—महाराज त्या नद्यांस कलिपा आणि सुरनदी हीं नांवें कशीं प्राप्त झालीं आणि कलियुगांत मनुष्यांनीं केलेलीं दारुण पातकें १ त्यांच्या संगमावर स्नान केल्यानें नाश पावतात याचें कारण काय? हें आश्चर्यकारक कथानक मला सांगा २ शंकर सांगतात हे पार्वति द्वापार युगाच्या अंतीं कलि प्राप्त झाला असें पाहून धर्म त्यापासून फार भ्याला आणि पळत सुटला. पळतां पळतां विचार करितो काय करूं! कोठें जाऊं! कोणमाझें रक्षण करील ३ असा विचार क-

**पार्वत्यु०॥ साकथंसुरपानामकासासुरनदीतिच ॥ कलौजातंमहापापंमानुषाणांसुदारुणं ॥ १ ॥ तत्रस्नानेनदेवेशकथंनश्यतितद्वद॥ एतदाश्चर्यमतुलंकथयस्वजगत्पते ॥ २ ईश्वर०॥ द्वापरांतेकलौप्राप्तेधर्मोलुप्त:पलायते ॥ किंकरोमिक्वगच्छामित्रातामांकुत्रतिष्ठति ॥ ३ ॥ मनसाचिंतितंतेनधर्मेणपरमार्थत: ॥ अस्तिमांरक्षकस्तत्रसिंदूराचलसंस्थित: ॥ ४ ॥ तत्रगत्वासधर्मोपियत्ररामोस्तिधर्मराट् ॥ त्रातारंप्रेक्ष्यरामंतंप्रणिपत्यच दंडवत् ॥ ५ ॥ धर्मेणचसमासेनस्तोत्रमेतदुदीरितं ॥ धर्मउवाच ०॥ अजन्मोजन्महीनस्त्वंजन्ममृत्युविनाशन: ॥ ६ ॥ योगिध्येयंपरंब्रह्मब्रह्मणस्त्वंपितामह: ॥ परमार्थपरं**

रीत असतां त्या धर्मास एकाएकीं स्मरण झालें कीं सिंदूर पर्वतावर भगवान् रामचंद्र निरंतर वास करितो त्या ठिकाणीं गेलें असतां तो आपलें रक्षण करील ४ असें मनांत आणून तत्काल तो त्या पर्वतावर गेला आणि रामचंद्राला साष्टांग नमस्कार करून ५ अंजलि जोडून अग्रभागीं नम्रतेनें उभा राहून संक्षेपानें स्तुति करिता झाला. धर्म ह्मणतो—हे रामा तुला जन्म नाहीं, मरण नाहीं, ६ योगी ज्याचें निरंतर ध्यान करितात तें परब्रह्म तूंच आहेस, तूंच ब्रह्म देवाचा जनक

आहेस. तूंच परमार्थ आहेस तूं सर्व तत्वांत श्रेष्ठ आहेस ७ तूं सर्व जीवांचा परमात्मा आहेस, तूं तेजो रूप आहेस तुला मायेचा लेश नाहीं, तूं सर्वेश्वर आहेस, तूं स्वतः निष्काम असून भक्तांचे अभीष्ट मनोरथ पूर्ण करितोस, ८ तूं निर्विकार आहेस, तुला प्रपंचाचा संसर्ग नाहीं, सर्व प्राणिमात्रांचा आदिपुरुष तूंच आहेस, तूं सर्व देवांमध्यें मुख्य आ- हेस ९ "चंद्रमामनसो जातः" इत्यादि मंत्रांनीं वेद तुझी स्तुति करितात. ह्याप्रमाणें धर्माची स्तुति श्रवणकरून रामचंद्र

**तत्वंपरात्परपरापरं ॥ ७ ॥ परमात्मापरंज्योतिःपरस्थःपरमेश्वरः ॥ परमात्मापरंधाम पूर्णकामः सदार्थिनां ॥ ८ ॥ निष्कामोनिरवद्यस्त्वंनिष्प्रपंचोनिराश्रयः ॥ आद्योयःस- र्वदेवानांसर्वदेवशिरोमणिः॥ ९ ॥ चंद्रमामनसेत्यादिमहिमाश्रुतिनोदितः ॥ अलमित्या दिरामोऽथलक्ष्मणेनसहायवान् ॥ १० ॥ श्रीरामउ० ॥ केनावमानितोधर्मभीतोभीतः पलायसे ॥ एतदाख्याहिमेशीघ्रंभयंत्यक्त्वाभयंतव ॥ ११ ॥ धर्मउ०॥ आगच्छतीहमां- शीघ्रंहंतुंकालसमप्रभः ॥ अहंतस्यभयाद्भीतःप्राप्तःपादांबुजंतव ॥ १२ ॥ आश्वास्यचा भयंदत्वास्थिरंकृत्वाथराघवः ॥ धर्मंतंपुरतःकृत्वालक्ष्मणायसमर्पितम् ॥१३॥ एतस्मि**

प्रसन्न होऊन त्याप्रत भाषण करितात १० धर्मा तुझा कोणी अपमान केला? तूं कोणाला भिऊन पळत आहेस, हें मला सांग. तूं भिऊं नको, तुला अभय आहे ११ असें रामचंद्राचें अभय वचन श्रवणकरून धर्म सांगतो माझा नाश करावयासाठीं कोणी एक काला सारखा भयंकर पुरुष माझ्या पाठीस लागला आहे, मी त्यास भिऊन आपलें रक्षण करावयाकरितां धांवत धांवत तुझ्या चरण कमला पाशीं प्राप्त झालों. १२ हें त्याचें भाषण ऐकून त्याला आश्वासन देऊन अभय वचन

दिलें आणि रक्षणार्थ लक्ष्मणाच्या स्वाधीन करिता झाला १३ इतक्यांत कलिही त्या ठिकाणीं प्राप्त झाला. त्याला पहातांच रामाला अतिशय क्रोध आला आणि त्यानें 'हूं' असा शब्द उच्चारिला १४ तोशब्द श्रवण करितांच तो कली विंध्य पर्वताच्या दक्षिणभागीं सिंदूर पर्वताच्या उत्तर प्रदेशीं जोरानें येऊन पडला. १५ आणि तत्काल त्याचा देह भयानें पाझरावयास लागला. तो थोड्याच वेळानें निर्झर (झरा) रूपझाला आणि रामचंद्राची प्रार्थना करूं लागला १६

न्नंतरेतत्रप्राप्तंदृष्ट्वाकलिंतदा ॥ हुंकारोच्चरितंतेनराघवेणसुकोपिना ॥१४॥ सश्रुत्वातंमहाशब्दंनि:पपातमहीतले ॥ विंध्यस्यदक्षिणेभागेसिंदूरस्योत्तरेतटे ॥ १५ ॥ तच्छब्देनद्रवीभूत्वासंजातोनिर्झरोदकं ॥ कलिर्विज्ञापयामासद्रवरूपीरघूत्तमं ॥ १६ ॥ कलि-रू०पापोऽहंपापकर्माहंपरद्वेष्युपपापकृत् ॥ इत्थंभूतस्यपापस्यजडस्यकरुणांकुरु॥१७॥ इच्छयानिच्छयावापियथादहतिपावक: ॥ त्वद्दर्शनंतथापापंयथाहंतितमोरवि: ॥१८॥ तृषितस्ययथातोयंव्याधितस्ययथौषधं ॥ क्षुधितस्ययथाचान्नंतथात्वंपापिनांगति: १९ कृपयारघुनाथोऽपिप्रोवाचेदंकलिंप्रति।रामउ०॥मुंचत्वाशुजडत्वंचस्थितिर्भवतुशाश्वती २०

हे रामा मी पापी आहे, मी पातकें करितों. मी निरंतर श्रेष्ठजनांचा द्वेष करितों, असा केवल पापमूर्ति जो मी त्या माझ्यावर तूं दयाकर १७ जाणून किंवा न जाणून जरी अग्नीवर पाय दिला तरी तो जसा जाळतो, अथवा उदय पावतांच सूर्य जसा अंधकाराचा नाश करितो, तसें तुझें दर्शन सर्व पातकांचा नाश करितें १८ तृषिताला जसें उदक, व्याधिताला जसें औषध किंवा क्षुधिताला जसें अन्न तसा तूं पाप्यांची गति आहेस. १९ असें कलीचें भाषण श्रवणकरतांच रामचंद्र दया

युक्त होऊन भाषण करितात. हे कले तुझी जडरूपानें चिरकाल स्थिति होवो. २० तूं प्रवाह रूप होऊन नदीच्या रूपानें यथेष्ट संचार कर. तुला 'कलिपानदी' हें नाम ठेविलें आहे. मात्र तूं ह्या सिंदूर पर्वताच्या कोणत्याच दिशेला प्रवेश करूं नको. २१ हें भाषण ऐकून पुनः कलि प्रार्थना करितो–हे रामचंद्रा तूं जर मला प्रसन्न झाला आहेस तर ह्या सिंदूर पर्वताच्या पूर्व, पश्चिम, दक्षिण आणि उत्तर अशा चतुः सीमा मला सांग. ह्मणजे मी त्या वर्ज करीन. २२ रामचंद्र सां-

कलिपेयंनदीनामविचरस्वयथासुखं ॥ प्रवेशोनत्वयाकार्यःसिंदूरस्यचतुर्दिशं ॥ २१ ॥
कलिरुवा०॥कासीमापूर्वदिग्भागेपश्चिमोत्तरदक्षिणे ॥ एतत्कथयमेदेवयदितुष्टोऽसिराघव ॥ २२॥ रामउ०॥पूर्वतःसुरसरित्तेचाहिमेशीतिचपश्चिमे ॥ सिद्धेशोदक्षिणेभागेहनुमानुत्तरेविदुः ॥ २३ ॥ आज्ञयामेऽनुतिष्ठत्वंयुगंयावत्समाप्यते ॥ आज्ञाभंगोनकर्तव्योयदीच्छासिमहत्सुखं ॥ २४ ॥ कलिरु०॥निर्झरंयद्वहत्यत्रअपेयंयत्कृतंत्वया॥पेयंकुरुपवित्रंमांशरण्यंत्राहिराघव ॥ २५ ॥ रामउ० ॥ पुरतोदेवनद्यांतेप्रवेशेणयथासुखं ॥ अनिंद्योभवपेयश्चमत्प्रसादात्पुनःशृणु ॥ २६ ॥ येचाद्यमनुजाःस्नांतिसंगमेसुरकलिप-

गतात–पूर्वेस सूरनदी, पश्चिमेस–हिमेशी, दक्षिणेस, सिद्धदेश, आणि उत्तरेस हनुमत्तीर्थ ह्या चतुः सीमेच्या आंत तूं प्रवेश करूं नये २३ ह्याप्रमाणें हें युग समाप्त होईपर्यंत माझ्या आज्ञेचें पालन कर. जर महत् सुखाची इच्छा असेल तर आज्ञा भंग करूं नको. २४ पुनः कलि प्रार्थना करितो हे राघवा हा जो निर्झर वाहत आहे हा तूं अपेय (पिण्याला अयोग्य) केला आहेस तो पवित्र करून पेय (पिण्याला योग्य) असा कर. तूं भक्त वत्सल आहेस ह्मणून मी तुला शरण आलों आहें. २५ हें त्याचें भाषण श्रवण करून रामचंद्र सांगतात–तूं पुढें देवनदीला मिळून माझ्या प्रसादानें तुझा प्रवाह आज

पासून दोष रहित आणि सर्वांस पेय असा होवो आणखीही मी तुला प्रसन्न होऊन वर देतों. २६ जे मनुष्य कलिपा आणि सुरनदी ह्यांच्या संगमावर भाद्रपद शुक्ल त्रयोदशीचे दिवशीं स्नान करितील२७त्यांच्या साऱ्या जन्मांत केलेल्या पातकांचा माझ्या प्रसादानें नाश होईल. हा कलीचा दिवस ( भाद्रशुक्ल त्रयोदशी ) प्राप्त झाला असतां विधिपूर्वक ह्या संगमावर जे स्नान करितात२८त्यांचीं पातकें,अग्नीनें जश्या कापसाच्या राशी दग्ध होतात त्याप्रमाणें भस्म होतील. हें रामाचें भा-

**यो: ॥ भाद्रेमासेत्रयोदश्यांशुक्लपक्षेसुपर्वणि ॥ २७॥ तेषांजन्मकृतंपापंमत्प्रसादाद्विनश्यतु ॥ कलेर्दिनंतुसंप्राप्यय:स्नातिविधिवन्नर: ॥ २८ ॥ तस्यजन्मकृतंपापंतूलौघइवदह्यति ॥ एतदाकर्ण्यतद्वाक्यंहृष्टस्तुष्ट:प्रिय:सदा ॥ २९ ॥ तेनोक्तस्तूर्णतोगत्वाप्रविवेशमहानदीं॥अथाज्ञप्त:कलिस्तेनराघवेणमहात्मना ॥३०॥ नत्वाशीघ्रंमहाबाहुंचचारपृथिवीतले ॥ एतत्प्रभावमतुलंसंवादंराघवस्यच ॥ ३१ ॥ पठेद्वाशृणुयाद्भक्त्यानचतंकलयेत्कलि: ॥ ३२ ॥ इतिश्रीपद्मपु० तृतीयोध्याय:समाप्त: ॥ छ छ**

पण श्रवण करून कलि आनंदित झाला २९ आणि सत्वर रामचंद्राच्या आज्ञेप्रमाणें त्या नदींत प्रवेश करावयास सिद्ध होऊन ३० रामचंद्राला भक्तिपूर: सर साष्टांग वंदन करून त्यांची आज्ञा मिळतांच त्या नदींत प्रवेश करून यथेष्ट पृथ्वीवर संचार करूं लागला. हा रामचंद्राचा अद्भुत पराक्रम, आणि कलि आणि रामचंद्र यांचा संवाद ३१ जो पठन करील अथवा श्रवण करील त्याला कलीपासून कधींच भय प्राप्त होणार नाहीं. ३२ इ०सिंदूराद्रि मा० तृतीयोध्याय: समाप्त:॥

पार्वती—हे महेश्वरा! ह्या पर्वताच्या चार दिशांचीं तीर्थें आणि चार दिशांच्या देवता यांविषईं मी तुमच्या प्रसादानें श्रवण केलें १ आतां आणखी जीं पर्वताच्या आंत आणि बाहेर तीर्थें आहेत तीं मला सांगा. २ शंकर सांगतात—त्या पर्वताच्या अंतर्भागीं पितृतीर्थ, आहे. त्याच्या समीप राम पादुका आहेत आणि त्याच्या दक्षिणभागीं प्रेत कुंड आहे. ३ ज्याला पितृ ऋणापासून मुक्त व्हावयाचें असेल आणि पितरांची प्रेतत्वा पासून मुक्ति करावयाची असेल त्यानें ४ त्या रामपदावर मधुमिश्रित

पार्वत्युउ०॥ चतुर्द्वाराणितीर्थानिद्वाराणामधिदेवत: ॥ मयाश्रुतंतुतत्सर्वंत्वत्प्रसादा न्महेश्वर ॥ १ ॥ अन्यानियानितीर्थानिनगबाह्यांतराणिच ॥ तानिसर्वाणिदेवेशकथयस्वममाग्रत: ॥ २ ॥ ईश्वरउ ०॥ शैलस्याभ्यंतरेचापिपितृतीर्थमनुत्तमं ॥ विद्येतेपादुके तत्रप्रेतस्थानंचदक्षिणे ॥ ३॥ ऋणंसक्तोरूध्दकुर्यात्तच्छिलोपरिविक्षिपेत्॥ मामकापितरोयत्रप्रेतभूतानिवर्तते ॥ ४ ॥ गृण्हंतुसत्तुमधुकंमयादत्तंशिलोपरि ॥ प्रेतत्वंतत्रनिस्तीर्यमुक्ता:पितृगणास्तदा ॥५॥ तत्रपिंड:प्रपातव्य:पितृकुंडेचगोष्पदे ॥स्वर्गद्वारेविष्णुपदेपितृकुंडेचगोष्पदे ॥६॥ यन्नाम्नादीयतेपिंड:सनीतोवैष्णवंपदं ॥ अमासोमसमायोगे

सत्तुपिंड अर्पण करावे आणि हे घेऊन माझे पितर उठोत असें ह्मणावें ह्मणजे त्याचे पितर प्रेतत्वा पासून मुक्त होऊन अक्षय्य पितृलोकीं वास करितात ५ त्या ठिकाणीं पितृकुंडावर व गोष्पदावर पिंडदान करावें. कारण, स्वर्गद्वारीं, विष्णुपदावर, पितृकुंडावर, आणि गोष्पदावर ६ ज्याच्या नामानें पिंडदान करावें त्यास वैकुंठवास प्राप्त होतो. सोमवती-अमावास्या,

चंद्रग्रहण, सूर्यग्रहण आणि ७ मातापितरांचा सांवत्सरिक श्राद्ध दिवस ह्या दिवशीं त्याठिकाणीं श्राद्ध केलें असतां गया श्राद्धाचें फलप्राप्त होतें. अमावास्या, व्यतीपात, अयन सक्रांति, विषुवसंक्रांति ८ ह्यादिवशीं त्याठिकाणीं श्राद्ध केलें असतां तें अक्षय्य केल्याचें फल प्राप्त होतें, जो गयेला जावयास अशक्त असेल किंवा ज्याचें कुटुंब मोठें असून गरीबी असेल ९ त्यानें त्याठिकाणीं पितृकुंडांत स्नानकरून रामपदावर पिंडदान करावें १० ह्मणजे त्याचे पितर आनंदित होऊन उत्तम

सोमसूर्यगृहेषुच ॥ ७ ॥ पितृमातृक्षयंश्राद्धंगयाशीर्षसमंस्मृतं ॥ अमावास्यांव्यतीपा तेअयनेविषुवेषुच ॥ ८ ॥ एभिर्दिनैर्नरैःश्राद्धंदत्तंचाक्षय्यतांव्रजेत् ॥ गयांगंतुमशक्तोयः पादहीनःकुटुंबिकः ॥ ९ ॥ तेनतत्रप्रदातव्यंपिंडंरामपदेकिल ॥ पितृकुंडेनरःस्नात्वा पिंडंचपातयेत्सुधीः ॥ १० ॥ स्वर्गतिंसवजत्याशुपितरोहृष्टमानसाः ॥ दत्वारामपदे पिंडमुपदेश्योपदेशकैः ॥११॥प्राप्नुवंत्युत्तमान्लोकान्सोऽपियातिपरांगतिं ॥ यःकरोति नरस्तत्रगोष्पदेपिंडपातनं ॥ १२ ॥ पितरोमुदितास्तस्यस्वर्गद्वारंव्रजंतिवै ॥ पातयिष्य त्यसौपिंडंसयास्यतिपरांगतिं ॥ १३ ॥ पितृकुंडेप्रेतकुंडेविष्णुकुंडेपितृक्षये ॥ गोष्पदेवि-

गतीला जातात आणि त्यालाही स्वर्गगति प्राप्त होते ११ तसेंच जो गोष्पदावर पिंडदान करितो त्याचे पितरही उत्तम लोकाप्रत जातात आणि त्यालाही उत्तम गति प्राप्त होते १२ त्याचे पितर असें ह्मणतात कीं हा गोष्पदावर पिंडदान करीत आहे तेव्हां आतां आह्मी उत्तम गतीला जाऊं १३ पितृकुंड, प्रेतकुंड, रामपद, गोष्पद, आणि विष्णुपद. इतक्या ठिकाणीं पिंडदान केलें असतां तें अक्षय होतें. १४ पितृतीर्थालाच रामगया असें रामचंद्रानें त्याचें वर्णन केलें ह्मणून त्या वेळेपासून

त्याला रामगया असें ह्मणतात. १५ हे पार्वति हें मी तुला संक्षेपानें पितृकुंडाचें माहात्म्य वर्णन केलें. १६ पूर्वीं सोम

ष्णुपादेचपिंडंदत्वाऽक्षयंव्रजेत् ॥ १४ ॥ पितृतीर्थंपुनर्नामपश्चाद्रामगयेतिच ॥ कृतंरा
मेणप्रकटंतेनरामगयास्मृतम् ॥ १५ ॥ मयासंक्षेपत:प्रोक्तंपितृतीर्थस्यगौरवं ॥ सोम
पा:पितरस्तत्रबहुकालंसुसंस्थिता: ॥१६ ॥ तेनेदंपितृतीर्थंतुनामधेयंपुरातनं ॥ १७ ॥
इतिश्रीपद्मपुराणेचतुर्थोध्याय:समाप्त: ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

प नावाचे पितर बहुकालपर्यंत त्या कुंडाचा आश्रय करून रहात होते त्या योगानें पुरातन कालापासून त्याला पितृतीर्थ हें नाम प्राप्त झालें आहे. १७ इति श्री सिंदूराद्रि माहात्म्ये चतुर्थोध्यायः समाप्तः ॥

पार्वती ह्मणते--पितृतीर्थाचें माहात्म्य मी आपल्या प्रसादानें श्रवण केलें आतां जें मी तुम्हाला विचारितें तें, यथार्थ कथन करा. ॥ १ ॥ हे महेश्वरा तूं सर्वज्ञ आहेस तुला अविदित असें कांहींच नाहीं तस्मात् त्या अंबकुंडाचें माहात्म्य सविस्तर मला वर्णन कर ॥ २ ॥ महेश्वर सांगतात हे भामिनि अंबकुंडाचें माहात्म्य वर्णन क-

पार्वत्यु०॥ पितृतीर्थस्यमाहात्म्यंश्रुतंत्वत्त:प्रसादत: ॥ इदानींब्रूहितत्वंमेयदितत्वंजग त्पते ॥ १ ॥ अंबकुंडस्यमाहात्म्यंसर्वज्ञानपरायण ॥ तत्सर्वंविस्तरेणेहकथयस्वमहे-श्वर ॥ २ ॥ ईश्वरउवाच ॥ अंबकुंडस्यमाहात्म्यंवक्तुंब्रह्मापिनक्षम:॥ संक्षेपेणप्रवक्ष्या मितवस्नेहेनभामिनि ॥ ३ ॥ अंबकुंडंसमावृत्यअष्टतीर्थानिसंतिवै ॥ गंगास्रोत:शंख तीर्थमग्नितीर्थमत:परं ॥ ४ ॥ चतुर्थमंबतीर्थंचपंचमंवरुणंस्मृतं ॥शुक्लतीर्थंतत:षष्ठंनर सिंव्हंचसप्तमं ॥ ५ ॥ अष्टमंचकुरुक्षेत्रंउत्तरेचास्तितत्रवै ॥ गंगोदकेनर:स्नात्वामुंड

रावयास ब्रह्मदेवही समर्थ नाहीं, तथापि तुझ्या प्रीतीमुळें संक्षेपानें मी तुला त्याचें वर्णन करितों. ॥ ३ ॥ ह्या अंबकुंडाचा आश्रयकरून आठ दिशांस आठ तीर्थें वास करितात. गंगातीर्थ, शंखतीर्थ, अग्नितीर्थ. ४ अंबतीर्थ, वरुणतीर्थ, शुक्लतीर्थ, नरसिंहतीर्थ, ॥५॥ आणि कुरुक्षेत्रतीर्थ प्रथम गंगा तीर्थावर स्नान करून विधिपूर्वक क्षौर विधि करावा.६

पुनः त्याच तीर्थावर विधिपूर्वक स्नान करून त्या देवतेला नमस्कार करून कुंडाला प्रदक्षिणा करावी ७ नंतर धूम्रपंके-श्वराची पूजा करून अनुक्रमानें इतर सर्व देवतांस नमस्कार करून त्यांचीही पूजा करावी ८ नंतर रामचंद्राच्या अग्रभागीं जाऊन निर्लज्जपणानें भूमीवर लोळावें. आणि धर्मेश्वर, हनुमान् आणि लक्ष्मण यांची पूजा करावी ९ धर्मेश्वराच्या मस्तकावर एक उदकांजलि अर्पण करावा. शिव जसें मस्तकीं गंगेतें धारण करितो तसा तो ती जलांजलि प्रीतीनें धारण

**नंतत्रकारयेत् ॥ ६ ॥ पुनर्निमज्यतत्रैवविधिवत्स्नानमाचरेत् ॥ नत्वातद्देवतांतत्र कुंडंकुर्यात्प्रदक्षिणं ॥ ७ ॥ ततोगत्वासमभ्यर्च्यधूम्रपंकेश्वरंशिवं ॥ क्रमेणदेवताःसर्वा नमस्कृत्यसमर्चयेत् ॥ ८ ॥ रामस्थानंतुसंप्राप्यलुंठितव्यंविलज्जवत् ॥ धर्मेशंपूजये द्भक्त्याहनुमंतंसलक्ष्मणं ॥ ९ ॥ गंडूषमात्रंयत्तोयंधर्मेशोपरिसंक्षिपेत् ॥ जटाजूटेयथा गंगांवहंतींमन्यतेतथा ॥ १० ॥ श्रीरामंसश्रियंदृष्ट्वानत्वामौनंविसर्जयेत् ॥ उपोष्य जागरंकृत्वापूजयित्वा स्वशक्तितः ॥ ११ ॥ पुनर्नत्वाप्रभातेवैगंगास्त्रोतसिमज्यच ॥ आन्हिकंतत्रकर्तव्यंश्राद्धंपिंडप्रपातनं॥१२॥ भूरिभोज्यंयथाशक्त्यापूजयेत्तीर्थसेवकान्॥**

करितो १० पुनः सीतेसहित रामचंद्राचें दर्शन घेऊन मौन विसर्जन करावें. आणि त्या दिवशीं उपोषण करून रामचंद्राची पूजा करावी आणि रात्रौ जागरण करावें. ११ पुनः प्रभातकालीं रामदर्शन करून गंगोदकीं स्नान करून संध्यावंदनादि आन्हिक विधि करावा आणि श्राद्ध करून पिंडदान करावें. १२ यथाशक्ति ब्राह्मण भोजन करावें, तीर्थावरील उपाध्यायांचें पूजन करावें. तसेंच अनाथ, पंगु, अंध, बधिर, इत्यादि जनांस यथाशक्ति दान करावें व ह्यांत कृपण

पणा करूं नये १३ गंगाद्वारीं पिंडदान केल्यानें पितर आकाश गंगेच्या तरीं जातात आणि त्या ठिकाणीं तीनशें वर्षे पर्यंत यथेष्ट क्रीडा करितात. १४ नंतर दुसऱ्या दिवशीं शंखतीर्थावर जावें आणि तिलमिश्रित उदकानें स्नान करून पिंडदान करावें. १५ आणि शंखनाद करावा ह्मणजे चिरकाल पर्यंत पितर स्वर्गीं आनंद पावतात. नंतर तिसरे दिवशीं अग्नितीर्था-

अनाथान्कृपणान्दीनान्वित्तशाठ्यंनकारयेत् ॥ १३ ॥ गंगाद्वारेपिंडदानंपितॄन्मंदाकिनींनयेत् ॥ क्रीडंत्याकाशगंगायांयावद्वर्षशतत्रयं ॥ १४ ॥ द्वितीयेदिवसेतत्रशंखतीर्थमनुव्रजेत् ॥ स्नानंतिलोदकैःकृत्वापिंडदानंपृथक्पृथक् ॥ १५ ॥ पितरःशंखनादैश्चक्रीडंतेशाश्वतीःसमाः ॥ तृतीयेदिवसेदेवविवन्हितीर्थमनुव्रजेत् ॥ १६ ॥ पूर्ववत्स्नानमारभ्यपितृतर्पणमेवच ॥ हुतभुग्लोकमासाद्यवसंतिपितरश्चिरं ॥ १७ ॥ अंबतीर्थेचतुर्थेऽन्हिस्नानंविधिवदाचरेत् ॥ श्राद्धकृद्भोजयेद्विप्रान्शर्कराघृतपायसैः॥ १८ ॥ तेनपिंडःप्रदातव्यःहव्यंतेषांसुदुर्लभं ॥ संभोज्यचतथाविप्रान्मधुक्षीरेणसर्पिषा ॥ १९ ॥

वर जावें. १६ आणि पूर्वीं प्रमाणें स्नानकरून श्राद्धकरावें ह्मणजे पितर अग्निलोकीं चिरकाल सुखभोगितात. १७ पुढें चतुर्थ दिवशीं अंबतीर्थावर जाऊन विधिपूर्वक स्नान करून श्राद्ध करावें आणि शर्करा, घृत, पायसमिश्रित अन्नानें १८ पिंडदान करावें. आणि यथाशक्ति मधु, घृत, दुग्ध इत्यादि पदार्थांनीं ब्राह्मण भोजन करावें. १९ यथाशक्ति रजत दक्षिणा द्यावी.

आणि सर्व कर्म अंबेशाला अर्पण करावें. आणि षोडशोपचारांनीं अंबेशाची पूजा करावी. २० नंतर पंचम दिवशीं वरुण तर्थिावर जावें. आणि त्या ठिकाणीं स्नान करून श्राद्ध करून पिंडदान करावें २१ ह्मणजे पितर आनंदित होऊन उत्तम गतीला जातात. नंतर सहाव्या दिवशीं शुक्लतीर्थीं जाऊन स्नान करावें २२ आणि भक्तिपुरःसर विधिपूर्वक श्राद्ध

रजतंदक्षिणांदद्यादंबेशायसमर्पयेत् ॥ गंधपुष्पैश्चनैवेद्यैरंबेशंपूजयेत्सुधी ॥ २० ॥
पंचमेन्हिततोगच्छेद्वारुणीतीर्थमुत्तमं ॥ निमज्यतत्रसंहृष्टःपिंडश्राद्धंचकारयेत् ॥२१॥
सुहृष्टास्तत्रगच्छंतिपितरःकाममव्ययं ॥ शुक्लतीर्थमनुप्राप्यषष्ठेऽन्हिस्नानमाचरेत् २२
सुस्नातोविधिवत्तत्रश्राद्धंयोऽपरयामुदा ॥ प्रकटंतत्कृतंकेनशुक्लतीर्थंततःस्मृतं ॥२३॥
हुतंदत्तंचयज्जप्तंश्राद्धंपिंडप्रदापनं ॥ तत्सर्वंशुक्लतीर्थेवैकृतमक्षय्यतांव्रजेत् ॥ २४ ॥
सप्तमेदिवसेतीर्थंनारसिंहंततोव्रजेत् ॥ नारसिंहेमहातीर्थेतत्रगंगास्वयंगता ॥ २५ ॥
हिरण्यकशिपोर्देहःपीडितोदक्षिणेकरे ॥ सरुधिरःसमाक्षिप्तोऽपतद्भूमौकलेवरं ॥२६॥

करावें. तें तीर्थ ब्रह्म देवानें प्रकट केलें आहे ह्मणून त्याला शुक्ल तीर्थ असें नांव प्राप्त झालें. २३ शुक्ल तीर्थावर जें हवन, दान, जप, श्राद्ध पिंडदान करतात तें सर्व अक्षय होतें. २४ नंतर सातव्या दिवशीं नारसिंह तीर्थीं जावें. त्या तीर्थांत साक्षात् भागीरथी वास करिते. २५ पूर्वी नरसिंहानें हिरण्य कशिपूचें विदारण केलें तें त्याचे रक्तानें भिजलेलें कलेवर नरसिंहा-

च्या हातांतून त्या ठिकाणीं पडलें. २६ त्या दिवसापासून त्या क्षेत्राला कलेवरपुर हें नाम प्राप्त झालें आहे. नरसिंहाचे हस्त रक्तानें भिजलेले प्रक्षालन करण्यासाठीं भूमीचें विदारण करून पातालांतून गंगा वर आली. २७ गंगेला पाहून नृसिंहानें त्या ठिकाणीं हस्त प्रक्षालन केलें. २८ त्या तीर्थी मनुष्य भक्तिपुरःसर जें स्नान, दान, श्राद्ध, पिंडदान, जपतपादि करून २९

तेनैवनाम्नाविख्यातंकलेवरपुरंविदुः ॥ करप्रक्षालनायास्यचागतासामहानदी ॥२७॥
भित्वाभूमिंसुदुर्भेद्यामागतात्वरितंतुसः ॥ दृष्ट्वागंगांसमापात्सांनिर्धूतास्तत्रपाणयः २८
तत्रस्नात्वानरोभक्त्याशुचिःपरमसात्विकः॥श्राद्धंपिंडप्रदानंचस्नानंदानंतपस्तथा २९
श्रीनृसिंहंसमुद्दिश्यतत्सर्वंचाक्षयंभवेत् ॥ अष्टमेदिवसेप्राप्तेकुरुक्षेत्रंततोव्रजेत् ॥ ३० ॥
तत्रदानंप्रकर्तव्यंसर्वदासौख्यमिच्छता ॥ हिरण्यंरजतंगावोमहिष्युष्ट्राह्यजादिकं ॥३१॥
अनड्वाहंहयंभूमिंरत्नंवासांसिहेमच ॥ रथंनवोढांकन्यांचसुवर्णतिलकानिच ॥ ३२ ॥
महादानानिचान्यानिस्थूलसूक्ष्मानियानिच॥अन्यानिचैवगुप्तानितानिसर्वाणिकारयेत् ३३

श्री नृसिंहाला अर्पितात तें सर्व अक्षय होतें नंतर अष्टम दिवशीं पर्वताच्या उत्तर भागीं कुरुक्षेत्रीं जावें ३० त्या ठिकाणीं निरंतर सुख प्राप्त होण्यासाठीं, हिरण्य,रजत, गाई महिषी, उष्ट्र, अज, ३१ वृषभ, अश्व, भूमि, रत्न, वस्त्र, रथ, कन्या, सुवर्णाचे केलेले तिलक, ३२ तसेंच गज,शिबिका इत्यादि महादानें आणि लहान मोठीं गुप्त दानें इत्यादि सर्व दानें करावीं. ३३

कुरुक्षेत्रीं मोहरीच्या इतकें जरी थोडें दान केलें तरी तें प्रलयकालींही नाश पावत नाहीं असें अक्षय होतें अशीश्रुती आहे, ३४ ह्मणून विशेषतः कुरुक्षेत्रीं विधिपूर्वक श्राद्ध करावें. आणि ब्राह्मणांस विनंती करावी कीं 'सर्वपरिपूर्णमस्तु' (सर्व परिपूर्ण असो) असा आशीर्वाद द्यावा. ३५ ह्याप्रमाणें हा अष्टतीर्थ विधि जो करितो त्याला दुर्लभ असें काय आहे? ३६ आपल्या एकाच्या बळानें सर्व पूर्वजांसहित तो, ज्याठिकाणीं गेलें असतां पुनरावृत्ति होत नाहीं अशा

कुरुक्षेत्रेतुयद्दत्तंस्वल्पंसर्षपमात्रकं ॥ प्रलयेऽपिननश्येतश्रुतैषावैदिकीश्रुति: ॥ ३४ ॥
विशेषेणतत:कुर्याछ्राद्धंपूर्णविधानत: ॥ श्राद्धकृद्ब्राह्मणान्पृछेत्परिपूर्णंसदस्तुमे॥ ३५॥
अनेनैवप्रकारेणअष्टतीर्थविधि:स्मृत: ॥ य:करोतिनरस्तत्रतस्यकिंदुर्लभंभवेत् ॥ ३६ ॥
उद्धृत्यैकोनर:पुंसस्तै:सार्द्धंसतुगच्छति ॥ यद्गत्वाननिवर्ततेतद्धामपरमंपदं ॥ ३७ ॥
सायुज्यंतत्रतेयांतिसत्यंसत्यंनसंशय: ॥ अंबालयेनरस्नात्वादृष्ट्वादेवंरघूत्तमं ॥३८॥
आजन्मयत्कृतंपापंतत्क्षणादेवनश्यति ॥ मित्रद्रोहीकृतघ्नोवास्वामिघातीगुरुद्विष:।३९।
कोऽपियोंऽबालयेस्नातिशुद्ध:पूतोभवेन्नर:।गोघातीबालघातीवास्त्रीघातीसुप्तघातुक:४०

वैकुंठलोकीं जातो. ३७आणि त्याठिकाणीं ते सर्व विष्णु देहीं मिळून जातात. हें सत्य आहे यांत संशय नाहीं. अंबकुंडावर स्नान करून रामचंद्राचें दर्शन करावें ३८ ह्मणजे जन्मापासून केलेलें पाप तत्क्षणीं नाश पावतें. मित्र द्रोही, कृतघ्न, स्वामीचा घात करणारा, गुरुद्रोही, ३९कसाही असो, अंबकुंडांत स्नान करितांच तत्काल सर्व पातकापासून मुक्त होतो. गोवध करणारा, बालहत्या करणारा, स्त्री वध करणारा, निजलेल्याचा घात करणारा. ४० हे, एकवार अंबालयीं स्नान करून

अंबेशाचें दर्शन केल्यानें पूत होतात. ४१ आणि सीतेसहित रामचंद्राचें दर्शन केलें असतां पुनः जन्मच प्राप्त होतनाहीं. स्वर्गावर, अंतरिक्षलोकीं, पातालांत किंवा भूमीवर जीं तीर्थें आहेत ४२ तीं सर्वं अंबतीर्थीं वास करितात. ह्मणून अंबकुंडांत स्नान करून अंबेशाचें जो दर्शन करितो ४३ तो पवित्र होतो आणि ऋषि, देव, पितर, ह्या तिघांच्याही ऋणापासून

सकृदंबालयेस्नात्वाशुध्यंतेतेचतुर्विधाः ॥ अंबकुंडेनरःस्नात्वादृष्ट्वाह्यंबेश्वरंशिवं॥४१॥
दृष्ट्वारामंश्रियायुक्तंपुनर्जन्मनविद्यते॥दिव्यंतरिक्षेपातालेयानितीर्थानिभूतले ॥४२॥
तानिसर्वाणितीर्थानिअंबकुंडेवसंतिवै ॥ अंबकुंडेनरःस्नात्वाह्यंबेश्वरमवेक्ष्यच ॥ ४३ ॥
सर्वेपूतोभवत्यत्रमुच्यतेचऋणत्रयात् ॥ व्यतीपातेनरःस्नात्वाचांबकुंडेकथंचन ॥ ४४ ॥
सहिरण्यंतिलादत्वालभतेपरमंपदं ॥ नरःस्नात्वातुसंक्रांत्यामंबकुंडेसमाहितः ॥ ४५॥
धान्यैरष्टादशैर्दत्तैःसूर्यलोकमवाप्नुयात्॥सौम्यायनेनरःस्नात्वागांदत्वातिलकांचनान्४६
सूर्यलोकभवाप्नोतिकल्पस्थायीनसंशयः॥सेवालेकर्दमालेचविशालेपुष्करेचिरं ॥४७॥

मुक्त होतो ४४ व्यतीपाताचे दिवशीं अंबकुंडीं स्नानकरून सुवर्णसहित तिलपात्र दान केल्यानें परमपद प्राप्त होतें. तसेंच संक्रांतीला स्नान करून ४५ अष्टादश धान्यें दान केल्यानें सूर्यलोक प्राप्त होतो. तसेंच मकर संक्रांतीचे दिवशीं अंबकुंडीं स्नान करून सुवर्ण आणि तिल ह्यां सहित धेनु दान द्यावी. ४६ ह्मणजे कल्पपर्यंत सूर्यलोकीं वास घडतो. सेवाल, कर्दमाल,

विशाल, आणि पुष्कर, ४७ ह्या तीर्थी चिरकाल स्नान केल्यानें जें फल प्राप्त होतें तें,अंबाकुंडीं एकवार स्नानाच्या फला च्या षोडशांशाचीही तुलना पावत नाहीं ४८ इच्छा नसतां दुसऱ्याच्या बलात्कारानें ज्याला अंबकुंडाचें स्नान घडतें त्या- लाही तें फलप्राप्त होतें हें निःसंशय आहे. ४९ कुब्जांबक तीर्थी सतत एक मास स्नान केल्यानें जें फळ प्राप्त होतें तें,

सकृच्चस्नानमंबालेकलांनार्हंतिषोडशीं॥अनिच्छयापियःस्नात्यंबकुंडेनरःक्वचित् ॥४८
सोऽपितत्फलमाप्नोतिनात्रकार्याविचारणा॥कुब्जांबकेनरःस्नात्वामासमेकंनिरंतरं॥४९
स्नानमात्रेणतत्पुण्यमंबालेहरिवासरे ॥ वेण्यांस्नानेनयत्पुण्यंयत्पुण्यंज्येष्ठपुष्करे ॥५०
यत्पुण्यंनैमिषारण्येतदंबालेचकार्तिके ॥ ५१ ॥ इतिश्रीपद्मपुराणेसिंदूराद्रिमाहात्म्ये
पंचोमोध्यायःसमाप्तः ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

एकादशीस अंबकुंडीं एकवार स्नानानें प्राप्त होतें ५० प्रयाग स्नानाचें जें पुण्य, ज्येष्ठपुष्कर स्नानाचें जें पुण्य, नैमिशार- ण्यांत तीर्थ स्नानाचें जें पुण्य तेंच कार्तिक मासांत अंबकुंडीं स्नानानें प्राप्त होतें. ५१ इति श्री पद्म० सिंदूराद्रि माहात्म्ये पंचमोध्यायः समाप्तः ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

शिव सांगतात हे पार्वति जोंपर्यंत ह्या पर्वतावरील मोक्षदायक असें तें नंदिवर्धन स्थान मनुष्यांच्या दृष्टिगोचर झालें नाहीं तोपर्यंतच काशी, अवंती, मथुरा ह्या पुण्य नगरींचें माहात्म्य आहे १ जीं स्थानें रम्य आणि उत्तम अशीं प्रसिद्ध आहेत त्यांत पहिलें वैकुंठ, दुसरें हें नंदिवर्धन, आणि तिसरें मेखलास्थान. ह्या शिवाय कोणतेंच असें स्थान नाहीं. २ द्वारकेंत वास करणें, नंदिवर्धन क्षेत्रीं वास करणें, किंवा मेखलाक्षेत्रीं वास करणें ह्या तिन्हींचें फल समान आहे. ३ प्रभासक्षेत्रीं वास

इश्वरउ० ॥ तावद्विराजतेकाशीअवंतीमथुरापुरी ॥ यावन्नदृश्यतेजंतोर्मोक्षदंनंदिवर्धनं ॥ १ ॥ वैकुंठंप्रथमंस्थानंद्वितीयंनंदिवर्धनं ॥ तृतीयंमेखलास्थानंचतुर्थनोपलभ्यते ॥ २॥ द्वारकायांचवासेनवासेननंदिवर्धने ॥ मेखलावासतश्चापित्रिभिरेभिःसमंफलं ॥ ३ ॥ यत्प्रभासेफलंजंतोर्दृष्ट्वासोमेश्वरंशिवं ॥ तत्फलंलभतेजंतुर्दृष्ट्वारामेश्वरंशिवं ॥ ४ ॥ मुखावलोकनंकृत्वायेनमंतिश्रियःपतिं ॥ तेतदाहतपापावैयांतिलोकमनामयं ॥ ५ ॥ अनिच्छयापियःपश्येद्राममूर्तिम्मनोरमां ॥ सोपियातिपरांमुक्तिंनात्रकार्याविचारणा॥६॥ कुरुक्षेत्रेनृणांस्नानात्सूर्यपर्वणियत्फलं ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

करून सोमेश्वराच्या दर्शनानें जें फल प्राप्त होतें तें फल ह्या पर्वतावर वास करून रामचंद्राच्या दर्शनानें प्राप्त होतें ४, रामचंद्राच्या मुख कमलाचें दर्शन करून सीतापतीला जे साष्टांग वंदन करितात ते मोक्षाला जातात. ॥ ५ ॥ आपली इच्छा नसतां केवल दुसऱ्याचे बलात्कारानें जो रामाचें मनोहर मुख कमल अवलोकन करितो तोही मुक्तीला जातो यांत संशय नाहीं..६ सूर्य ग्रहण सोमवती इत्यादि पर्वणीस

कुरुक्षेत्रीं गंगास्नानाचें जें फल तें रामदर्शनानें प्राप्त होतें. ७ एकेसमयीं परम पवित्र आणि अतिरमणीय अशा त्या सिंदूर पर्वतावर तपोनिधि अगस्ति ऋषि रामदर्शनार्थ प्राप्त झाले ८ अगस्ति ऋषीला पाहून रामचंद्राला आनंद झाला आणि तत्क्षणीं त्याला साष्टांग नमस्कार करून अग्रभागीं नम्र होऊन रामचंद्र अगस्तीप्रत सादर प्रश्न करिता झाला ९

अमासोमसमायोगेतत्फलंरामदर्शनात् ॥७॥ अथप्रसन्नेविजयेसुपुण्ये॥मनोहरेसिंदुर शैलशृंगे ॥ तपोविशिष्टंहिपरोह्यगस्तिं ॥ पप्रच्छरामोहिमहाप्रशस्तं ॥ ८ ॥ तमगस्तिंतत दादृष्ट्वातत्रराम:सुविस्मित:॥ कृतांजलिपुटोभूत्वायप्रच्छश्रद्धयान्वित: ॥ केदेवा:का नितीर्थानिचाश्रमा:केद्विजातय: ॥ ९ ॥ अत्रतिष्ठंतियेकेऽपिउग्रेतपासिसंस्थिता: ॥१० सिंदूरगिरिनामायंकस्मात्तत्कथयस्वमे ॥ एतत्सर्वंसमासेनयथातथ्यंद्विजोत्तम ॥ ११ ॥ अगस्तिरुवा० ॥ साधुसाधुमहाप्राज्ञयत्त्वंमांपरिपृच्छसि ॥ ब्रह्मलोकेमयाह्यस्यश्रुतंशैल स्यगौरवं ॥ १२ ॥ पुराणेमहिमातस्यब्रह्मणाकथितोमम ॥ तत्तेऽहंवच्मियत्नेनदैवेर्न

हे मुनिवर्या ह्या पर्वतावर किती देवता आहेत, तीर्थें कोणकोणतीं आहेत, पवित्र आश्रम, कोणते आहेत,तसेच उग्रतपश्चर्येंत निमग्न असे ऋषि कोणकोणते आहेत १० ह्या पर्वताला सिंदूरगिरि हें नाम कसें प्राप्त झाले हें सर्व सविस्तर मला सांगा ११ हें रामाचें भाषण श्रवणकरून अगस्ति ऋषि ह्मणतात हे राघवा हा प्रश्न तूं फार चांगला केलास. ब्रह्मलोकीं ह्या पर्वताचें माहात्म्य मीं श्रवण केलें आहे १२ कोणीएक समयीं प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें ह्या पर्वताचा महिमा मज करितां

वर्णिला तो मी तुला सांगतों. ह्या पर्वताचा महिमा देवही जाणत नाहींत १३ अशा ह्या पर्वतावरील तीर्थ यात्रा वर्णन करितों, कीं जी केल्यानें मनुष्यांचे सर्व मनोरथ पूर्ण होतात आणि मोक्षप्राप्ति होते. प्रथम गौतमऋषींच्या आश्रमीं जावें तेथें इहलोकींचे मनोरथ पूर्ण करणारें पुण्य घडतें. १४ त्या आश्रमांत गौतमानें नव सहस्र आणि नउशें वर्षें अत्युग्रतप केलें. त्या तपः प्रभावानें शंकर त्याला प्रसन्न झाला. १५ आणि पांच मुखें, दहा हस्त, ज्याला शोभताहेत अशा स्वरूपानें

ज्ञायतेऽपियत् ॥ १३॥ तीर्थयात्रांप्रवक्ष्यामिकामदांमोक्षदांनृणां ॥ कामदःसृष्टिमार्गेण गौतमस्याश्रमोभवेत् ॥ १४ ॥ नववर्षसहस्राणिनववर्षशतानिच ॥ गौतमेनतपस्तप्त्वातत्रशंभुर्वशंगतः ॥ १५ ॥ पंचवक्त्रोदशभुजःप्रत्यक्षःसमजायत ॥ तुष्टोऽहंतवभद्रंतेयत्तेमनसिवर्तते ॥ १६ ॥ वरंब्रूहिवरंब्रूहिवरंब्रूहियथेप्सितं ॥ अदेयंनास्तिवैब्रह्मन्यत्तप्तंचतपस्त्वया ॥१७॥ गौतमउवा०॥ यदितुष्टोऽसिदेवेशसर्वभावेनशंकर॥ अत्रतिष्ठमहादेवलोकानांहितकाम्यया ॥ अत्रस्थितःशिवोराजन्गौतमेनाभियाचितः ॥१८॥ गौतमेश्वरनामाभूद्भक्तमुक्तिफलप्रदः ॥ दृष्टिमासाद्यतिष्ठंत्यत्राणिमाद्यष्टसिद्धयः ॥१९॥

त्याला दर्शन देऊन त्याप्रत प्रसन्न वाणीनें बोलता झाला हे गौतमा मी तुला प्रसन्न झालों. १६ तुला अभिष्ट असेल तो वर माग. तुझ्या तपानें मी इतका संतुष्ट झालों आहे कीं तुला अदेय असें मला काहींच दिसत नाहीं. १७ हे शंकराचें भाषण श्रवणकरून गौतम प्रार्थना करितो—हे शंकरा तूं जर मला प्रसन्न झालास तर लोकांचें हित करण्याकरितां ह्या ठिकाणीं तूं निरंतर वास कर. १८ ही गौतम ऋषींची याचना सफल करण्यासाठीं भगवान् शंकर भक्तांना मुक्तिदायक,

गौतमेश्वर हें नाम धारणकरून त्या स्थलीं वास करिता झाला. १९ त्याच्या कृपा कटाक्षा पुढेंच अणिमादि अष्टसिद्धि तेथें वास करितात. पुनः गौतम प्रार्थना करितात हे महादेवा जे मनुष्य ह्या तीर्थीं स्नान करून तुझें ( गौतमेश्वराचें ) पूजन करितील २० त्यांचे सर्व मनोरथ परिपूर्ण व्हावे. हें त्याचें भाषण श्रवणकरून शंकर वर देतात हे गौतमा जें तूं लोकानुग्रहार्थ याचितोस तें २१ सर्व माझ्या अनुग्रहानें पूर्ण होईल. मी तुझ्या तपस्येनें संतुष्ट झालों आहे. शुक्ल आणि कृष्ण ह्या

**गौतमउवा० ॥ येचात्रमनुजास्तीर्थेऽवगाह्यार्चंतितेशिवं ॥ तेषांमनोरथाःसर्वेपरिपूर्तिंव्रजंतुवै ॥ २० ॥ ईश्वरउ० ॥ यत्त्वयायाचितंसर्वंलोकानांहितकारणात् ॥ सर्वंभवतुविप्रेंद्रमयितुष्टेनसंशयः ॥ २१ ॥ अष्टम्यांचचतुर्दश्यांपक्षयोरुभयोरपि ॥ अत्रस्नात्वानरोभक्त्याकर्मकोटिंसमुद्धरेत् ॥ २२ ॥ चतुर्दश्यष्टमीवापिसोमेनसहितायदा ॥ तदास्नानेनसिद्धिःस्याद्देवानांचातिदुर्लभा ॥ २३ ॥ भवत्यष्टौसिद्धयश्चसंगच्छेदंबिकालयं ॥ स्नानंदानंतथाध्यानंपूजनंपिंडपातनं ॥ २४ ॥ यजनंदमनंमौनंकृतमक्षय्यतांव्रजेत् ॥**

दोनही पक्षांच्या अष्टमी आणि चतुर्दशी ह्या तिथींस २२ जो भक्तीनें ह्या तीर्थावर स्नान करील तो कोट्यावधि पातकांपासून मुक्त होईल. अष्टमी अथवा चतुर्दशी सोमवारानें युक्त अशी प्राप्त होईल. २३ तेव्हां ह्या तीर्थाच्या स्नानानें जी अष्टसिद्धि प्राप्त होते ती देवांनाही दुर्लभ होय आणि त्यानें शेवटीं अंबिकालयीं गमन होतें. २४ स्नान, दान, ध्यान, पूजन पिंडदान, यजन, मौन हीं सर्व ह्या तीर्थीं केलेलीं अक्षय होतात २५ माघमासांतील चतुर्दशीस ( शिवरात्रीस ) जो जागरण

करितो तो जेथून परत यायचें नाहीं अशा अक्षय लोकीं जातो. २६ वंध्या, मृतवंध्या अथवा जिचे गर्भस्राव होतात अशी स्त्री असेल तिनें कार्तिक, चैत्र, अथवा श्रावण ह्या मासांत २७ प्रत्येक मासाच्या शुक्ल चतुर्दशीला ह्या ठिकाणीं उमा महेश्वरांची, गंध पुष्पादि षोडशोपचारपूजा करून देवाच्या अग्रभागीं नृत्यगीतादि करावें २८ ह्या प्रमाणें जो शंकराचें आ-

**माघमासेचतुर्दश्यांजागरंकुरुतेनरः ॥ २५ ॥ क्रीडतेसोऽक्षयेलोकेयद्गत्वाननिवर्तते॥**
**वंध्यावामृतवत्सावातथागर्भस्रवंतिका ॥ २६ ॥ कार्तिकेचैत्रमासेचश्रावणेराजसत्तम॥**
**शुक्लपक्षेचतुर्दश्यांदेवंदेवींसमर्चयेत् ॥ २७ ॥ गंधपुष्पादिनैवेद्यैर्गीतमंगलवादनः ॥**
**अनेनविधिनापूज्यनरोजातिस्मरोभवेत् ॥२८॥ देव्याश्वपश्चिमेभागेतीर्थमेकंप्रशस्यते॥**
**मार्कंडेयमितिख्यातंसर्वपापहरंपरं ॥ २९ ॥ तत्रस्नात्वानरःकश्चिन्मार्कंडेयंप्रपूजयेत् ॥**
**तत्रस्थंदृश्यतेशृंगंकोटियज्ञफलंलभेत् ॥३०॥इतिश्रीपद्मपु०सिंदूराद्रि०षष्ठोध्यायःसमाप्तः**

राधन करील तो जातिस्मर होईल. देवीच्या पश्चिमभागीं मार्कंडेय ह्या नांवाचें अतिउत्तम सर्व पातक नाशक असें तीर्थ आहे २९ त्या तीर्थी स्नान करून जो मार्कंडेयाचें पूजन करील ॥ आणि त्याच ठिकाणीं उभा राहून ह्या पर्वताचें शिखर ज्याला दिसेल त्याला कोटियज्ञ केल्याचें फल प्राप्त होईल. ॥ ३० ॥ इति श्री पद्मपुराणे सिंदू० षष्ठोध्यायः समाप्तः ॥ ॥

पार्वती प्रश्न करिते—जी पूर्वीं तुह्मी वापिका वर्णन केली तिचें फल मला सांगा. ती पाप नाशकरणारी पुण्यकारक वापिका कोठें आहे. १ ईश्वर सांगतात—नृसिंहाच्या ईशान्येस ती वापिका आहे. पूर्वीं हिरण्यकशिपूला कश्यप पुत्र जो नरसिंह त्यानें मारिलें तेव्हां त्याच्या हस्तांतील मुद्गर ( ह्या नांवाचें आयुध ) भूमीवर पडलें २ त्या योगानें त्या ठिकाणीं मोठा खळगा पडला व सर्व पर्वतांतून तेथें जलप्राप्त झालें ह्मणून त्या तीर्थाला मुद्गरवापी हें नाम प्राप्त झालें. ३ ह्या मुद्गरवापींत

पार्वत्युवा० ॥ वापीयाप्राक्त्वयाप्रोक्ताफलंतस्या:प्रचक्ष्वमे ॥ कुत्रतिष्ठतिसावापीपुण्य दापापनाशिनी ॥१॥ ईश्वरउ०॥ईशान्येदेवदेवस्यनृसिंव्हस्यबलीयस: ॥ पीडितंमुद्ग रंतस्यकश्यपस्यात्मजस्यवै ॥ २ ॥ तत्रसंपादितागर्त्ताभित्वाशैलंसमंतत: ॥ नाम्ना तेनैवविख्यातावापीसिंदूरपर्वते ॥ ३ ॥ वापीजलेनर:स्नायात्कृत्वाश्राद्धंप्रयत्नत:॥ वैष्णवायप्रदातव्याशक्त्यागौश्चपयस्विनी ॥ ४ ॥ क्रीडतेसुरलोकेवैयावद्रोमाणितत्त ना ॥ तावद्वर्षाणिसंख्यातम्दातावसतिगोपुरे ॥ ५ ॥ तत्रयेवैष्णावा:संतिब्राह्मणावे दपारगा: ॥ सगुणानिर्गुणास्तेभ्योदातावैसादरंनमेत् ॥ ६ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

स्नानकरून जो श्राद्ध करितो आणि वैष्णवाला दूध देणारी अशी गाय दान देतो ४ तो गाईच्या रोमा. इतक्या वर्षां पर्यंत स्वर्ग लोकीं आणि गो लोकीं यथेष्ट क्रीडा करितो असें सांगितलें आहे. ५ त्या स्थानीं जे वैष्णव ब्राह्मण आहेत—मग ते सद्गुणी असोत अथवा निर्गुणी असोत. त्यांनां आदरानें साष्टांग नमस्कार करावा. ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

पार्वती विचारते महाराज वैष्णवांचें लक्षण काय ? त्यांचें चिन्ह काय, ते कर्मं काय करितात, त्यांचा स्वभाव कसा असतो हें संपूर्ण मला सांगा. ७ शिव सांगतात हे महाभागे हा तूं फारच उत्तम प्रश्न केलास, आतां एकाग्र भावानें मी सांगतों तें श्रवण कर ८ कलियुगांत खरोखर विष्णुभक्त असे वैष्णव फारच थोडे आहेत, मुळीं वर्णाश्रम विहित कर्मं करणारे वैष्णव या जगांत पांच, सात असतील नसतील ९ जे जे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र आपापल्या धर्मांत तत्पर असतात, त-

पार्वत्यु० ॥ वैष्णवाःकेनचिन्हेनज्ञातव्याःकेनकर्मणा ॥ केनभावेनदेवेशतदाचक्ष्वमहेश्वर ॥ ७ ॥ ईश्वरउ० ॥ साधुसाधुमहाभागेयन्मांत्वंपरिपृच्छसि ॥ तदहंकीर्तयिष्यामिशृणुष्वैकाग्रमानसा ॥ ८ ॥ कलौनवैष्णवाःसंतिशोभनाविष्णुनोदिताः ॥ सप्तपंचभविष्यंतिवर्णाश्रमरतानराः ॥ ९ ॥ स्वेस्वेकर्मण्यभिरताब्राह्मणाःक्षत्रशूद्रविट् ॥ ब्रह्मचारीगृहस्थश्चवानप्रस्थोपिमस्करी ॥ १० ॥ यद्येषांविहितंकर्मतन्निष्ठाह्यच्युतप्रियाः ॥ वैष्णवास्तेमहादेविनेतरेवैष्णवाविदुः ॥ ११ ॥ वापीजलस्यमाहात्म्यंसंक्षेपेणप्रकाशितं ॥ इदानींसंप्रवक्ष्यामियानितीर्थानिबाह्यतः ॥ १२ ॥ बृहदालंसरोनामपूर्व

सेंच जे जे ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यासी १० आपापल्या कर्माचें आचरण करितात तेच या युगीं विष्णुला प्रिय आहेत व तेच या युगींचे खरे वैष्णव, इतर तसे नाहींत ११ ह्या प्रमाणें वापी जलाचें माहात्म्य संक्षेपानें वर्णिलें. आतां बाह्य भागीं जीं तीर्थें आहेत त्यांचें वर्णन करितों १२ बृहदाल ह्या नांवाचें सरोवर पूर्व भागीं आहे. त्या सरोवराच्या तीरीं

बृहन्मनु देवमानानें सहस्र वर्षें पर्यंत तपश्चर्या कारिता झाला १३ त्या सरोवरीं स्नान करून जो बृहन्मनु शिवाचें पुजन कारि-तो तो सर्व पातकांपासून मुक्त होऊन साक्षात् शंकर रूपाशीं मिळून जातो १४ नंतर त्यांच्या समीपच जंबुकाल ह्या नांवाचें तीर्थ आहे त्या ठिकाणीं जावें. त्या ठिकाणीं जंबुक ऋषीनें पूर्वीं अत्युग्र तप केलें होतें १५ त्या तीर्थीं आमलक(आंवळे) आणि सर्षप [ मोहरी ] ह्यांच्या चूर्णाचा लेप करून सोमवारीं स्नान करून १६ अक्षता आणि यव ह्यानीं मिश्रित उदकानें वेदोक्त

भागेबहिःस्थितं ॥ बृहन्मनुस्तपस्तेपेदिव्यवर्षसहस्रकं ॥ १३ ॥ तत्रस्नानंनरःकृत्वा पापंत्यक्त्वासुरालयं ॥ बृहन्मनुशिवंपूज्यशिवसायुज्यतांव्रजेत् ॥ १४ ॥ जंबुकालंत तोगच्छेत्समीपेतत्रतिष्ठति ॥ तपस्तप्तंदुराधर्षंजंबुकेनमहर्षिणा ॥ १५ ॥ आमलैःसर्ष पैर्मिश्रैःस्नात्वासोमदिनेनरः ॥ तत्रस्नात्वाशुचिर्भूत्वातर्पयेच्चबृहस्पतिं ॥ १६ ॥ अयुतं तर्पणंकार्यंअक्षतामिश्रितैर्यवैः ॥ वेदोक्तेनैवमंत्रेणतर्पयेच्चबृहस्पतिं ॥ १७ ॥ गुर्वेशंपू-ज्यकल्याणिनैवेद्यैर्घृतपाचितैः ॥ संमुखंतस्यदेवस्यउपविश्यसुखासने ॥ १८ ॥ मंत्रस्या वर्तनंकार्यंवाचस्पतयेनमः ॥ तावदावर्तयेन्मंत्रंयावत्संख्यायुतंभवेत् ॥ १९ ॥

मंत्रानें दहा हजार, बृहस्पतीचें तर्पण करावें. १७ नंतर बृहस्पतीची पूजा करून घृतपाचित नैवेद्य अर्पण करावा आणि त्या-च्या संमुख आनंदकारक आसनावर बसून १८ ‘ वाचस्पतयेनमः ’ ह्या मंत्राचा दहा सहस्र जप करावा १९ आणि तो जप ‘ वाचस्पतिः प्रीयतां ’असें ह्मणून वाचस्पतीला अर्पण करावा आणि त्या मंत्रानें अभिमंत्रित, आणि पंचगव्य, धूपगंध यानीं युक्त असें उदक २० जो सात अंजलि प्राशन करील त्याचें सर्व मुखदोष नाश पावतात; त्या मंत्राचा जप करून उदक प्राशन

करावें २१ नंतर त्या दिवशीं उपोषण करून रात्रीं जागरण करावें. आणि शर्करा, घृत, पायस इत्यादि पदार्थांनीं ब्राह्मणभोजन करावें २२ आणि वाक्पति प्रीत्यर्थ आपण पारणा करावी. ह्मणजे कवींस व विद्वज्जनांस प्रिय अशी अति मधुरवाणी प्राप्त होते २३ गुरुतीर्थीं एक वार स्नान केल्यानें सर्व तीर्थ स्नानाचें फल प्राप्त होतें. नंतर चक्रतीर्थीं जावें जें समीप वास करणाऱ्या चक्रेश नामक शिवाच्या नामानेंच प्रसिध्द आहे २४ तें उत्तम कमलांनीं सुशोभित आहे. त्यांतील प्रत्येक कमलास तीं-

निवेद्यवाचस्पतयेप्रीयतामितिवाक्पतिः ॥ मंत्रितंपंचगव्येनधूपगंधसमन्वितं ॥२०॥
यःपिबेत्सप्तगंडूषान्मुखदोषाद्विमुच्यते ॥ मानसेमंत्रमुच्चार्यपिबेत्तन्मंत्रमात्रितं ॥२१॥
उपोष्यतद्दिनंमंत्रीजागरंतत्रकारयेत् ॥ ब्राह्मणान्भोजयेत्प्रातःशर्कराघृतपायसैः ॥ २२
पारणंतत्रकर्तव्यंवाक्पतिःप्रीयतामिति ॥ ततःप्रवर्ततेवाचाकवीनांविदुषांप्रिया ॥ २३
गुरुतीर्थेसकृत्स्नात्वासर्वतीर्थफलंलभेत् ॥ चक्रतीर्थंशुभंस्थानंख्यातंदेवेनतत्परं ॥ २४॥
सकर्णिकैर्वरैःपद्मैःशोभितंतन्महत्सरः ॥ अष्टाधिकपवित्राणित्रीणिपर्णशतानिच ॥२५
एकैकस्यांबुजस्यात्रपत्राणांचशतत्रयं ॥ स्नात्वाचक्रालयेतीर्थेचक्रेशंपूजयेच्छिवं ॥ २६
चक्रंकृत्वासुवर्णस्यदत्वायातिशिवालयं ॥ चक्रंतत्रास्तिदेवस्यहरिणारोपितंपुरा ॥२७

नशें आठ पत्रें आहेत २५ त्या तीर्थावर स्नान करून चक्रेश्वराची पूजा करावी २६ सुवर्णाचें चक्र करून दान द्यावें ह्मणजे शिवलोकीं वास घडतो. त्या स्थानीं पूर्वीं श्रीहरीनें आपलें सुदर्शन चक्र ठेविलें ह्मणून २७ तेथें सुदर्शन चक्र संतुष्टी साठीं ब्राह्मण भोजन करावें. त्या तीर्थाच्याच समीपच धानुष्क ह्या नांवाचें परमेश्वरकृत तीर्थ आहे २८ पूर्वीं रामचंद्रानें बाणासहित आपलें धनुष्य त्या ठिकाणीं ठेविलें होतें. त्या धानुष्क तीर्थावर स्नान करून रामचंद्राच्या संमुख

उमें राहून २९ शार्गेश्वराचें ध्यान करून पुनः स्नान करून ३० सुवर्ण, रजत, ताम्र अथवा काष्ठ याचें धनुष्य करून त्याची गंधपुष्पादि उपचारांनीं पूजा करून ३१ हे चापरूप शार्ग देवा तूं पूर्वीं अनेक राक्षस, दानव, आदिकरून दुष्ट मारिलेस तो तूं आतां माझ्या पापाचा संहार कर ,, ३२ अशी प्रार्थना करून तें ब्राह्मणाला दान द्यावें आणि सांगतार्थ यथाशक्ति दक्षिणा द्यावी ३३ नंतर धन्वेश्वराची पूजा करून नमस्कार पूर्वक स्तुति करावी ह्मणजे कधींच मोह प्राप्त होत नाहीं कारण

ब्राह्मणान्भोजयेत्तश्चाप्रीतमस्तुसुदर्शनम् ॥ तस्यतीर्थस्यसंलग्नंधानुष्कंदेवनिर्मितं ३०
स्वधनुस्तत्ररामेणगुणंबाणसमन्वितं ॥ धनुरालेनरःस्नात्वारामस्याभिमुखेस्थितः॥३१
शार्गेशंमनसाध्यात्वानिमज्योन्मज्यतत्ववै॥तत्रचापंद्विजायार्प्यंशार्गवत्कल्पितंनरः।३२
सौवर्णंराजतंवापिताम्रंवादारुजंस्मृतं ॥ गंधपुष्पैःसमभ्यर्च्यब्राह्मणायनिवेदयेत् ॥३३
मंत्रेणानेनदातव्यंप्रयत्नेनसुरेश्वरि ॥ हतास्त्वयासुरादैत्याराक्षसादानवादिषः ॥३४॥
त्वंशार्गहरमेपापंचापरूपनमोऽस्तुते॥ दत्वाचापंद्विजंपूज्यदक्षिणांचस्वशक्तितः ॥ ३५॥
धन्वीशंपूजयेद्देवंनत्वास्तुत्वानमुह्यति॥हताश्चधन्विनोलोकेबध्नातितच्चसर्वदा।३६॥

त्या शार्ग धनुष्यानें पुष्कळ पराक्रमी दुष्ट मारिले आहेत आणि तें दुष्टांस आतांही मारीत आहे ३४ त्या तीर्थाच्या पश्चिम भागीं पिप्पल ह्या नांवाचें सरोवर आहे पिप्पल ह्या नांवाचा एक महान ऋषी त्या ठिकाणीं चिरकाल अत्युग्र तप करिता झाला ३५ तो ऋषी वृक्षावरून आपोआप खालीं पडलेलीं पक्कपर्णे तीन दिवसानीं एकवेळ भक्षण करीत असे ३६ ह्या प्रमाणें बहु

काल पर्यंत तप केल्यानें भगवान् त्र्यंबक प्रसन्न होऊनत्याला प्रत्यक्ष दर्शन देऊन भाषण करिते झाले ३७ शिव ह्मणतात हे पिप्पल ऋषे मीं तुला प्रसन्न झालों वर माग. पिप्पल ऋषी प्रार्थना करितो देवा जर तूं प्रसन्न झालास ३८ तर हें तीर्थ माझ्या

॥ तस्यतीर्थस्यपार्श्वेतुविद्यतेपिप्पलंसर:॥पिप्पलाख्योमहांस्तत्रतपस्तेपेसुदारूणं॥३५
स्वयंपतितपत्राणिपक्वानिचफलानिच ॥मध्यमानिचसार्द्राण्यभक्षयत्र्यदिनत्रयं ॥ ३६
अनयासंख्ययायुक्तोबहुकालंसरसिस्थित: ॥ भगवांस्त्र्यंबकोदेव:प्रत्यक्ष:समजायत
॥ ३७ ॥ त्र्यंबकउ०॥ तुष्टस्तेपिप्पलचाहंवरंब्रूहियथेप्सितं ॥ पिप्पलउवा०॥मन्यसे
यदिदेवेशतीर्थस्यास्यचत्र्यंबक ॥ ३८ ॥मन्नाम्नायातुविख्यातिंयदितुष्टोऽसिमेप्रभो ॥
अत्रस्नानंचदानंचश्राध्दंपिंडप्रपातनं ॥ ३९ ॥ अक्षयंकुरुदेवेशसदातिष्टाविदांवर ॥
त्र्यंबकउ० ॥ अत्रतिष्ठामिभोब्रह्मन्त्वन्नामाहंभवाम्यहं ॥ ४० ॥ तस्मैतत्रवरंदत्वा

नांवानें प्रसिद्ध व्हावें. आणि ह्या ठिकाणीं केलेलें स्नान, दान, श्राद्ध, पिंडदान ३९ हीं सर्व अक्षय व्हावींत आणि तूं निरंतर ह्या तीर्थीं वास करावा. शिव ह्मणतात हे ब्रह्मणा मी तुझ्या नांवानें [ पिप्पलेश्वर ह्या नामानें ) ह्या तीर्थीं वास करितों ४०

ह्याप्रमाणें त्याला वर देऊन शिव त्या तीर्थी वास करिते झाले त्या तीर्थी जें स्नान दानादि करावें तें सर्व अक्षय होतें ४१ रामचंद्राच्या दक्षिण भागीं अश्वमेध ह्या नांवाचें पापनाशक अति पवित्र तीर्थ आहे ४२ त्या अश्वमेध तीर्थी स्नान करून

स्थितस्तत्रशिवःस्वयं ॥ तस्मिन्तीर्थेचयत्कर्मतत्सर्वंचाक्षयंभवेत् ॥४१॥ रामस्यदक्षिणेभागेसरस्तिष्ठतिशोभनं ॥ अश्वमेधमितिख्यातंसर्वपापहरंपरं ॥ ४२ ॥ हयमेधेनरःस्नात्वाहयंदत्वासदक्षिणं ॥ हयेशंपूजयेल्लिंगंसर्वपापात्प्रमुच्यते ॥ ४३ ॥ इतिश्रीपद्मपु०सिंदू०सप्तमोध्यायःसमाप्तः ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७

अश्वाचें दान करावें आणि हयेश्वर लिंगाची पूजा करावी ह्मणजे सर्व पातकांपासून मुक्ति होते ४३ इतिश्री प.सिंदू० सप्तमोध्यायः ७॥ समाप्तः

पार्वती प्रश्न करते हे शंकरा त्या ठिकाणीं अश्वमेध यज्ञ कोणीं केला, त्या राजाचें नांव काय, त्याची प्रसिद्धी कोणत्या कारणानें झाली १ हें सर्व अति आश्चर्यकारक आख्यान सविस्तर यथार्थ मला वर्णन करा तें श्रवण करण्यास मी अत्युत्सुक झालें आहे २ शंकर सांगतात पूर्वीं कृतयुगीं नंदी ह्या नांवाचा राजा होता, तो सहज एके दिवशीं मृगया करण्यासाठीं अरण्यांत गेला ३ अरण्यांत इकडे तिकडे फिरतां फिरतां तपंगिरीच्या समीप प्राप्त झाला ४ त्या ठिकाणीं एक दिव्य अश्व

पार्वत्युवा०॥केनतत्रकृतोयागोहयमेघोमहामखः ॥ कासंज्ञातस्यनृपतेःकथंख्यातिंगतो भुवि ॥ १ ॥ एतत्सर्वंसमासेनयाथातथ्येनशंकर ॥ ब्रूहिसर्वंममाश्चर्यंकेनचैवकृतोमखः ॥ २ ॥ शंकरउ०॥आसीत्पुराकृतयुगेनंदीनामःक्षमापतिः ॥ निर्गतःसवनोद्देशंमृगयार्थंसधर्मवित् ॥ ३ ॥ भ्रममाणइतश्चेतःप्राप्तस्तत्रमहावने ॥ तपंगिरेस्तस्यपार्श्वेउपकंठे मनोहरे ॥ ४ ॥ ततोव्रजन्ददर्शाग्रेहयंदेवेनानिर्मितं ॥ वाजीचांचल्यमानःसन्धृत स्तेनबलीयसा ॥ ५ ॥ अनुचराततःप्राप्तावाजीवहकरास्तथा ॥ ततस्तमर्थयामासुस्त स्मान्नोदीयतामिति ॥ ६ ॥ नमुक्तवान्वचश्चाश्वंरक्षयामासधर्मवित् ॥ रक्षितःसमहा

त्याच्या दृष्टीस पडला. तो अश्व तीव्र वेगानें चालत होता तथापि मोठ्या चपलतेनें राजानें त्याला धरिलें ५ इतक्यांत अश्वरक्षक त्या ठिकाणीं प्राप्त झाले. त्यांनीं राजास " हा अश्व आम्हां आह्मास द्या " अशी याचना केली ६ परंतु त्या धार्मिक राजानें त्यांस कांहींच उत्तर दिलें नाहीं आणि त्या अश्वासही सोडिलें नाहीं. आणि अश्वाच्या रक्षणार्थ त्यानें नागरिकादि लोक नेमिले ७

तेव्हां त्यानें तेथें एक गांव झालें; तें गांव नंदी राजानें वसविलें ह्मणून त्याला नंदिवर्धन असें नाम प्राप्त झालें. त्या ठिकाणीं राहून त्यानें राज्य केलें आणि अश्वमेध यज्ञ केला ८ पुढें कांहीं काळानें तो उग्र तपानें या लोकापासून मुक्त झाला. असो, ह्या कारणास्तव त्या तीर्थाला अश्वमेध हें नाम प्राप्त झालें ९ अश्वमेध तीर्थीं एकवार स्नान करून यथाशक्ति सुवर्णदान केल्यानें अश्वमेध यज्ञाचें फल प्राप्त होतें आणि अंतीं ब्रह्मसायुज्य मिळतें १० ज्याला संपत्तीची इच्छा असेल त्यानें, घृत, मधु, दधि, दुग्ध,

स्थानेपौरजानपदादिभिः ॥ ७ ॥ नंदिनावर्द्धितंग्रामंतन्नाम्नानंदिवर्धनं ॥ तत्रराज्यं कृतंतेनहयमेधःकृतोमखः ॥ ८ ॥ पंचत्वंसगतःपश्चात्तपसोग्रेणधर्मवित् ॥ कृतस्तेना श्वमेधेोहिजानीहिसुरसुंदरि ॥ ९ ॥ हयमेधेनरःस्नात्वासकृद्दद्याच्चकांचनं ॥ हयमेध फलंप्राप्ययातिब्रह्मसनातनं ॥ १० ॥ घृतक्षौद्रदधिक्षीरैस्तिलैर्वापियवैःफलैः ॥ होतव्यं सिद्धैरन्नाद्यैस्तदर्थेभूतिमिच्छता ॥ ११ ॥ तिलैश्चसर्पिषाव्रीहियवगोधूमतंदुलै ॥ हूयते हयमेधेवैतदानंत्यायकल्पते ॥ १२ ॥ वैश्वदेवःप्रयत्नेनकर्तव्योगृहमेधिना ॥ अकृत्वा तंत्रयेोगच्छेदात्मावैतेनवंचितः ॥ १३ ॥ तस्योत्तरेतथेशान्येयूपकूपौचतिष्ठतः ॥ यूपं

तिल, यव, चरु आणि इतर फलें यानीं व सिद्ध पक्वान्नांनीं हवन करावें ११ तिल, घृत, व्रीहि, यव, गोधूम, आणि तंदूल यांनीं हयमेध तीर्थीं हवन केलें तर तें अक्षय होतें १२ त्या तीर्थीं एकवार तरी अवश्य वैश्वदेव करावा. त्या ठिकाणीं वैश्वदेव केल्याशिवाय जो जाईल त्यानें आपणच आपणाला फसविल्यासारखें होते १३ त्याच्या उत्तरभागीं यूप आणि कूप अशीं दोन तीर्थें आहेत. यूपाला प्रदक्षिणा करून कूपापाशीं जावें १४ आणि स्नान करावें ह्मणजे पातकांपासून

मुक्ति होऊन शिवालय प्राप्त होतें त्याच्या पश्चिम भागीं चंडी कुप आहे १५ त्या ठिकाणीं इंद्रानें नऊदुर्गादेवींची स्थापना केली आहे. त्या चंडी कूपावर स्नान करून नऊ दुर्गांची पूजा करावी १६ आणि कुमारिकेस किंवा सुवासिनीस भोजन घालावें ह्मणजे दुर्गेच्या लोकीं जाऊन मानव यथेष्ट क्रीडा करितो १७ त्याच तीर्थाच्या समीप नैर्ऋत्य भागीं ऋणत्रयापासून मुक्त करणारें, ऋणमोच ह्या नांवाचें मोठें कुंड आहे १८ त्या ऋणमोच कुंडीं भक्ति पुरःसर जो स्नान

प्रदक्षिणंकृत्वागत्वाकूपसमीपतः ॥ १४ ॥ छिन्नपापोमहाकूपेनरोयातिशिवालयं ॥
तस्यपश्चिमदिक्पार्श्वेचंडीकूपःसुदुर्लभः ॥१५॥ नवदुर्गाःस्थितास्तत्रवासवेनप्रतिष्ठिताः ॥
चंडीकूपेनरःस्नात्वानवदुर्गाःसमर्चयेत् ॥ १६॥ भोजयेत्तत्रकौमारींनारींवाथसुवासिनीं॥
दुर्गालयमनुप्राप्यक्रीडंतेतत्रमानवाः ॥ १७ ॥ समीपेनैर्ऋतेदेशेतस्यतीर्थस्यभामिनि॥
ऋणमोचंमहाकुंडंऋणत्रयविमोचकं ॥१८॥ ऋणमोचेमहाकुंडेसम्यक्श्रद्धासमन्वितः॥
यःस्नातिमनुजोदेविमुच्यतेसऋणत्रयात् ॥ १९ ॥ ऋणमोचेनरःस्नात्वापिबेत्तोयंविना
तृषा ॥ पुनातिसकलंदेहंऋणमस्थिगतंध्रुवं ॥ २० ॥ समीपेतस्यकुंडस्यविख्याततुहि

करितो तो ऋषि, देव, पितर, ह्या तिघांच्या ऋणापासून मुक्त होतो १९ ऋणमोच तीर्थीं स्नान करून तृषा नसेल तथापि उदक प्राशन करावें ह्मणजे सर्व देह पवित्र होतो २० हे हिमनगदुहिते ह्या कुंडाच्या समीप, अति प्रसिद्ध पाप्यांच्याही मनोरथाची पूर्ति करणारें पापमोच ह्या नांवाचें एक सरोवर आहे २१ त्यांत स्नान केल्यानें पातकी-पातका पासून मुक्त होतो आणि रोगी रोगा पासून मुक्त होतो. असें होण्याचें कारण तुला सांगतो तें श्रवण

कर २२ पूर्वी सिंधू ह्या नांवाचा एक राजा होता. तो मदना सारखा स्वरुपवान्, क्षमावान्, दानशूर, प्रजेचें पालन करण्यांत सदा दक्ष असा होता २३ त्यानें बुद्धिपूर्वक पंच महापातकें केलीं आणि नंतर त्याला पश्चात्ताप झाल्यामुळें त्या पातकांपासून मुक्त होण्यासाठीं भयत्रस्त असा होऊन त्यानें ब्राह्मणांस प्रश्न केला २४ हे ब्राह्मणहो मी तुह्माला शरण आलों आहे. माझ्या पातकाला प्रायश्चित्त सांगा २५ ब्राह्मण प्रश्न करितात राजा ज्या पापाला

मात्मजे ॥ पापमोचंसरोनामकामधुक्पापकर्मणां ॥ २१ ॥ मुच्यतेपातकैःपापीरोगी रोगैःप्रमुच्यते ॥ मोचनंपातकस्यात्रकारणंतस्यवच्मिते ॥ २२ ॥ सिंधुर्नाम्नापुराराजा कामदेवसमद्युतिः ॥ क्षमावान्दानशीलश्चप्रजापालनतत्परः ॥ २३ ॥ तेनपंचमहा पानिकृतानितुबुद्धितः ॥ पृष्टास्तुब्राह्मणास्तेनपापभीतेनधीमता ॥ २४ ॥ प्रायश्चित्तं प्रयच्छध्वंयुष्माकंशरणंगतोऽ ॥ स्म्यहंविप्रेश्वेराब्रूतकिंकुर्यामितिनिश्चितं ॥ २५ ॥ ब्राह्मणाऊचुः ॥ शोधनंकस्यपापस्यकिंतत्पापंवदस्वनः ॥ बुध्याऽबुध्याकृतंपापंतत्कथं मनुजाधिप ॥ २६ ॥ सिंधुरुवा०॥ गोप्यंकृतंकथंविप्राःपातकंकथयामिवः ॥ यत्कृतं पातकंतेनतत्सर्वंविनिवेदितं ॥ २७ ॥ तस्यतद्वचनंश्रुत्वाक्रोधाविष्टाद्विजोत्तमाः ॥

प्रायश्चित्त विचारितोस तें पातक काय, तसेंच तें बुद्धिपूर्वक केलें किंवा अज्ञानानें केलें हें सांग ह्मणजे प्रायश्चित्त सांगतां येईल२६ राजा ह्मणतो मीं जीं पातकें केलीं आहेत तीं गुप्त केलीं आहेत तीं सांगण्याला योग्य नाहींत. परंतु आपण विचारितां त्या पेक्षां सांगतो. असें ह्मणून त्यानें केलेलीं सर्व पातकें त्यांस सागितलीं २७ त्याचें तें भाषण ऐकतांच ब्राह्मण क्रुद्ध होऊन ‘ तूं तीर्थयात्रा कर ’ अशी त्याला आज्ञा करिते झाले २८ पुनः राजा प्रश्न करितो—महाराज

किती कालपर्यंत तीर्थयात्रा करावी आणि किती तीर्थें फिरावीं. असें वचन ऐकून ब्राह्मण सांगतात राजा द्वादश व र्षें तीर्थयात्रा करावी आणि तितक्या कालांत बाराशें योजनें ( ४८०० कोश ) देश पर्यटन केलें पाहिजे २९ हें ब्राह्मणांचें भाषण श्रवण करून त्यांना निरोप देऊन आपलें राज्य पुत्राच्या स्वाधीन करून सरस्वत्यादि तीर्थांचीं स्नानें करीत करीत ३० तो राजा सिंदूर पर्वतावर प्राप्त झाला. अति रमणीय अशा त्या पर्वताचें दर्शन करून जागोजाग तपश्चर्या करीत वसलेल्या ऋषींस पाहून ३१ समस्त तीर्थांचे ठायीं स्नान करून पापमोचन कुंडावर. प्राप्त

उक्तवंतस्ततोवाक्यंतीर्थयात्रांकुरुप्रभो ॥२८॥ राजोवाच ॥ कासंख्यातीर्थयात्राय:कि
यत्कालंद्विजोत्तमा: ॥ वर्षाणिद्वादशाब्रूमोशतद्वादशयोजनं ॥ २२ ॥ अनुज्ञाप्यततो
विप्रान्राज्यंदत्वासुतस्यवै ॥ सरस्वत्यादितीर्थानिअभिषिंच्ययथाक्रमं ॥ ३० ॥ प्राप्तोऽ
सौतत्रराजापियत्रासौसिंदुराचल: ॥ दृष्ट्वातंसर्वतोरम्यंऋषिसंघै:समाकुलं ॥ ३१ ॥
सर्वतीर्थेषुसुस्नात:प्राप्तोसौपापमोचनं ॥ कुंडंदृष्ट्वामहाभागेउच्चैर्वोषंरुरोदस: ॥३२॥
वल्कलै:सहितोदीनोमूर्छित:पतितोजले ॥ अघंतदंगसंभूतंनिश्चक्रामबहि:स्थितं ॥३३॥
रोदनार्तम्तदापापंविलपंतम्महारवं ॥ तंदृष्ट्वामहदाश्चर्यंलब्धसंज्ञोब्रवीत्सतं ॥३४॥
सिंधुरुवा॥कथंरोदिषिकिंभूतंकातेग्लानि:कुतोभयं॥असंगतंमयादृष्टंब्रूहितथ्यंमनोगतं ॥३५

झाला आणि तें कुंड पाहतांच उच्च स्वरानें रोदन करूं लागला ३२ व त्याचे अंगावर वल्कलें होतीं त्यांसह वर्तमान तो मूर्छित होऊन त्या तीर्थांत पडला, तत्काल त्या राजाचें पातक त्याच्या शरीराला सोडून बाहेर पडलें ३३ आणि मोठ्यानें रडूं लागलें. इतक्यांत राजा सावध झाला आणि पाहतो तों आपलें पातक आपल्या शरीराला सोडून दुःखार्त होऊन रडत आहे; असें पाहतांच त्याला आश्चर्य वाटलें आणि त्याला तो प्रश्न करितो ३४ तूं कां रडतेस, तुला इतकी ग्लानि कां प्राप्त झाली, तुला माझा वियोग कसा झाला, तुझी काय इच्छा आहे, हें सर्व मला सांग ३५ हें राजाचें भाषण श्रवण करितांच पातक बोलूं लागलें. हे राजा मी तुझ्या देहांत चिरकाल वास केला. परंतु ह्या तीर्थाचें

दर्शन झाल्यामुळें मी आतां तुझ्या शरीरांत राहण्यास समर्थ नाहीं. मला आज्ञा दे ३६ ह्या पापमोचन तीर्थावर राहण्यास मी शक्त नाहीं. असें बोलून तें पातक त्याच्या पापानें कृश झालेल्या शरीरासह निघून गेलें ३७ नंतर त्या कुंडांत स्नान करतांच राजा पापमुक्त होऊन पूर्ण मनोरथ झाला. त्यानें आपल्या अंगावरील वल्कलें त्या ठिकाणीं टाकिलीं तीं अद्याप नदी—होऊन त्या ठिकाणीं वाहत आहेत ३८ सिंधु राजा आनंदित होऊन आपल्या नगरीस आला

पापमुवाच०॥ त्वदंगेऽहंचिरंस्थित्वाइदानींगम्यतेमया ॥ यास्यामिस्वगृहंसिंधोतीर्थस्यास्यप्रभावत: ॥ ३६ ॥ पापमोचेनमेशाक्तिस्तस्माद्यास्यामिभूपते ॥ एवमुक्त्वागतंतूर्णयज्जीर्णंपापिनोवपु: ॥ ३७ ॥ पूर्णकामस्तदासिंधुर्निर्गत:कुंडमध्यत: ॥ वल्कलंतेनसंक्षिप्तंनदीभूत्वाप्रवर्तते ॥ ३८ ॥ हृष्टस्तदासिंधुराजानिर्जगामाश्रमंप्रति ॥ प्राप्तराज्य:श्रियायुक्तोभुक्त्वाभोगाननेकधा ॥३९॥ पुनश्चासौमहाराजातपस्तस्वादिवंगत:॥ तेनैवंपापमोचस्येतिहासोस्तिमबोदित: ॥ ४० ॥ पापमोचेनर:स्नात्वाश्रद्धयासहितोपिस: ॥ पापमुक्तोभवेत्तूर्णनात्रकार्याविचारणा ॥ ४१ ॥ इतिश्रीपद्मपुराणेसिंदूराद्रिमाहात्म्येअष्टमोध्याय:समाप्त: ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥

आणि पूर्ववत् राज्य करूं लागला. आणि इहलोकींचे सर्व भोग भोगून ३९ तपाच्या योगानें स्वर्गगति पावला. शिव ह्मणतात हे पार्वति ह्या कारणास्तव या तीर्थाला पापमोचन हें नाम प्राप्त झालें. हा पापमोचन तीर्थाचा इतिहास मी तुला सविस्तर वर्णिला ४० पापमोचन तीर्थी भक्ति पुर:सर जो स्नान करील तो तत्काल सर्व पातकांपासून मुक्त होईल ह्यांत संशय नाहीं. ४१ इ० अष्टमोध्याय: समाप्त:॥ ८ ॥

शिव सांगतात—त्या पापमोच तीर्थाच्या पश्चिम मार्गी कांहीं अंतरावर शंख तीर्थ आहे. त्या तीर्थावर शंख नांवाचा महामुनी तप करीत आहे. १ त्या तीर्थी जाऊन स्नान करून भिक्षेसाठीं कमंडलु २ कौपीन, वस्त्र, कंथा, ऊर्णावस्त्र ( घाबळी इत्यादि लोकरीचें वस्त्र ) पादुका, आणि सुगंध पुष्पें हीं दान करून उत्तम भोजन घालावें आणि भोजनोत्तर स्वतः पादसंवाहन करावें ३ ह्या प्रमाणें जो करितो त्याला इहलोकींचीं सर्व सुखें प्राप्त होतात आणि शेवटीं

शंभुरुवा० ॥ तस्यपश्चिमदिग्भागेकिंचिद्दूरेहितिष्ठति ॥ तपस्तपतितत्रैवशंखोनाम्ना महामुनिः ॥ शंखतीर्थततोगच्छेत्स्नानंकुर्यात्सरोवरे ॥ शंखतीर्थेनरःस्नात्वादद्याद्भिक्षा कमंडलुं ॥ २ ॥ कौपीनयुगलंकंथामूर्णावस्त्रमुपानहौ ॥ भोजनंमधुपुष्पाणिपादाभ्यंगंस्वयंचरेत् ॥ ३ ॥ एवंकरोतियोमर्त्यःसनित्यंविंदतेफलं ॥ प्राप्नोत्यनामयंस्थानंयद्गत्वाननिवर्तते ॥ ४॥ तत्रतत्सकलंकार्यमंतव्यंनान्यथाक्कचित् ॥ तत्तीर्थमोक्षदंन्नृणां कथनीयंनकस्यचित् ॥ ५ ॥ पार्वत्यु० ॥ शंखतीर्थस्यमाहात्म्यंश्रुतंदेवमयाविभो ॥ पापारियत्त्वयाप्रोक्तंतीर्थंपुण्यप्रदायकं ॥६॥ दृष्ट्वापापात्प्रमुच्येतभीतःकुंभीयथाहरेः॥

मोक्ष प्राप्ति होते ४ ह्या प्रमाणें त्या तीर्थी संपूर्ण विधि करावा. त्या तीर्थाविषयीं मनांत शंका आणूनये तें तीर्थ मोक्षदायक आहे. ह्मणून हें फार गुप्त ठेवावें ५ पार्वती प्रश्न करिते—हे देवा शंख तर्थाचें माहात्म्य मीं तुझ्या पासून श्रवण केलें. आतां पापारि ह्या नांवाचें जें पुण्यकारक तीर्थ तुह्मी पूर्वी वर्णिलें कीं६ ज्याच्या दर्शनानें, सिंहाला पाहतांच हस्ति जसा भिऊन पळतो तसें पातक भिऊन पळतें असें जें तें तीर्थ त्याचें माहात्म्य मी पूर्वी आपणापासून श्रवण केलें नाहीं ७

तें माहात्म्य मी जर तुह्मला प्रिय आहे तर मला सविस्तर सांगा हें प्रियेचें भाषण श्रवण करून महादेव ह्मणतात हे प्रिये ज्या पापारी तीर्थाचें माहात्म्य मी अद्याप कोणाला सांगितलें नाहीं ८ तें आतां मी तुला सविस्तर सांगतो—तूं तें श्रवण करण्यास अशी पुढें ये. ह्या शंख तीर्थाच्या समीपच पश्चिमभागीं एकाच ओळीनें तें तीर्थ आहे ९ ज्या तीर्थाच्या दर्शन मात्रानेंच सर्व पापीजन पापापासून मुक्त होतात. त्या तीर्थाचा इतिहासही मला नाहीत आहे, तो हे पवित्र स्त्रिये मी सांगतो श्रवण कर १० पूर्वी धुंधु ह्या नांवाचा ब्रह्मदेवापासून ज्याला वर प्राप्त झाला आहे आणि अनेक यज्ञ क-

**इदंतीर्थंमयादेवनश्रुतंतेंऽधकांतक ॥ ७ ॥ यत्तवाहंप्रियादेवकथयस्वममाग्रत: ॥ महादेवउ० ॥ नकस्यचिन्मयाख्यातंतीर्थपापारियत्प्रिये ॥ ८ ॥ इदानींसंप्रवक्ष्यामिइतएहिममाग्रत: ॥ पश्चिमेतस्यसंलग्नंएकपंक्त्यातुविद्यते ॥ ९ ॥ दृष्ट्यापुनातिसर्वान्वैपापिष्ठान्पापकारकान् ॥ इतिहासोऽपितस्याथमयाज्ञातोहिचानघे ॥ १० ॥ आसीत्पुराधुंधुनामोब्रह्मदत्तवरोनृप: ॥ यज्वादानपतिर्दक्ष:प्रजापालनतत्पर: ॥ ११ ॥ कदाचित्सत्सभामध्येउपविष्ट:सुखासने ॥ अमात्यैरावृतोवृद्धैर्मंत्रिभि:सहपार्थिव: ॥ १२ ॥ पुरोहितैर्ब्राह्मणैश्चपुरंदरइवापर: ॥ नानाविनोदसंहृष्टाभार्यावामगेमनस्विनी ॥ १३ ॥ एतस्मिन्नंतरेगौरिजातंकौतूहलंमहत् ॥ त्रिविक्रमोब्राह्मणोनामभृगुवंशसमुद्भव: ॥ १४ ॥**

रणारा, असा एक राजा होता ११ कोणी एके समयीं तो राजा सभेमध्यें सिंहासनावर बसला आहे; त्याच्या समीप वृद्ध वृद्ध मंत्री, प्रधान, अमात्य हे बसले आहेत; १२ दक्षिण भागीं पुरोहित आणि इतर विद्वान् ब्राह्मण बसले आहेत; त्याच्या वामभागीं प्रियतमा स्त्री बसली आहे. केवळ भूमीवरील इंद्रच, असा तो राजा सभेंत अनेक प्रकारचे विनोद करीत आहे १३ इतक्यांत हे गौरि त्या ठिकाणीं एक आश्चर्य घडलें. भृगुवंशांत उत्पन्न झालेला त्रिविक्रम ह्या नांवाचा एक ब्राह्मण त्या ठिकाणीं प्राप्त झाला १४ त्यानें समग्र एक लक्ष वर्षें पर्यंत हिमालय पर्वतावर अत्युग्र तप केलें,

त्याच्या योगानें त्याचें सर्वांग फुटलें. १५ मुख, कटि आणि पाद हीं अंगें वक्र झालीं. मुख आणि नेत्र लाल झालीं ह्या प्रमाणें त्याची आकृति पिशाचा सारखी दिसूं लागली १६ असा तो वक्रांग पण सूर्यासारखा तेजस्वी ब्राह्मण या राजाच्या सभेंत एकाएकीं प्राप्त झाला, त्याला पाहतांच राजा आसनावरून उठला १७ आणि बसावयास आसन देऊन, कुशल प्रश्न करून, मधुपर्क पूजा करून पयस्विनि धेनु अर्पण करून, त्याप्रत भाषण बोलूं लागला १८ महाराज आज मी आपल्या दर्शनानें कृतकृत्य झालों, आज मी धन्य आहे. आतां माझें खचित कल्याणच

लक्षमेकंतपस्तप्तंलक्षंसाग्रमनादित: ॥ हिमालयेमहादोषेर्विस्फुटितांगंसमंतत: ॥१५॥
मुखंवक्रंकटिर्वक्रापादयोरुभयोस्तथा॥लोलाक्षाननसंक्रुध्द:पैशाचंवदतिक्वचित् ॥१६॥
प्राप्तस्ततोमहातेजा:कोटिसूर्यसमद्युति: ॥ ददर्शतंद्विजंराजाउत्थायसहसाभृशं॥१७॥
निवेद्यस्वासनंतस्मैपृष्ट्वातंकुशलंस्वयं॥मधुपर्क:कृतस्तस्यगांनिवेद्यपयस्विनीं॥ १८॥
राजोवा० ॥ धन्योऽहंकृतकृत्योऽहंमंगलंमेभविष्यति ॥ इतिराज्यश्रियायुक्तंतत्त्यागंतेद
दाम्यहं ॥ १९ ॥ त्रिवक्रउवा० ॥ भुंक्ष्वराज्यंमयादत्तंदेहिराज्ञीमिमांमम ॥ राजो०॥
मुक्त्वाराज्ञींददाम्यन्यांआत्मानंहिददामिते ॥ २० ॥ नृपतेश्चवच:श्रुत्वासंप्रदीप्तोहुता
शवत् ॥ शापंगृहाणपापिष्टदत्वादानंनदीयते ॥ २१ ॥

होईल, तेव्हां माझें सर्व राज्य मी आपणांस आतां दान करितों असें ह्मणता झाला १९ नंतर, तो त्रिवक्र ब्राह्मण राजाप्रत बोलतो—राजा हें जें राज्य तूं मला दिलेंस तें मी तुला देतो त्याचा तूं यथेच्छ उपभोग घे. मला राज्याची अपेक्षा नाहीं. फक्त ही राज्ञी (तुझी भार्या) मला दे. असें ब्राह्मणाचें भाषण श्रवण करतांच राजा ह्मणतो हे ऋषे ह्या राज्ञी शिवाय पाहिजे तें माग, इतर स्त्रिया पाहिजे तितक्या देतों, फार तर काय मी आपला देहही देईन परंतु ही राज्ञी माझ्याच्यानें देववत नाहीं २० हें राजाचें भाषण श्रवण करून तो ब्राह्मण क्रोधानें अग्नी सारखा प्रदीप्त होऊन राजा प्रत

भाषण करितो—हे अधमा पूर्वी मला सर्व राज्य दिलेंस आणि आतां राज्ही देत नाहींस या पेक्षां तूं दिलेलें दान परत घे-णारा असा पापी आहेस, तर आतां मी शाप देतों हा घे २१ माझ्या तपोबलानें तूं महा पातकयुक्त हो, असें बो-लून हस्तपाद प्रक्षालन करून, आचमन करून, अंजलींत उदक घेऊन; २२ मी जें तप केलें आहे त्याच्या सामर्थ्यानें हा मिथ्यावादी राजा सत्वर जलोदरानें युक्त होवो, व हा महापापी होवो असा शाप देता झाला २३ असें ब्राह्मणाचें शाप वचन श्रवण करतांच राजा सर्व प्रधानां सहवर्तमान ब्राह्मणाला साष्टांग नमस्कार करून शरण गेला. तत्काल तो

महापापसमायुक्तोभवत्वंमेतपोबलात् ॥ प्रक्षाल्यपादावाचम्यसंगृहीत्वाजलंकरे ॥२२
मयातपःकृतंयद्वैतेनपापीजलोदरी ॥ भविष्यस्याशुपापिष्ठोनोपकारःकृतोमम ॥२३॥
इत्युक्तोमंत्रिभिस्तस्यपतितम्तुपदांतिकं ॥ हृतक्रोधस्तदानेनधुंधुनाब्राह्मणस्तथा॥२४॥
अनुग्रहःकृतस्तेनत्रिवक्रेणमहात्मना ॥ विचार्यमनसातेनवाक्यमुक्तंनृपोत्तम ॥२५॥
येनगच्छतिपापंतेतद्वदामिमहानृप ॥ राजोवाच ॥ यदितुष्टोसिमेब्रह्मन्शमंयातुजलोदरं
॥ २६ ॥ त्रिवक्रउ०॥ नान्यथातुहिमद्वाक्यंशापतस्तेनृपोत्तम ॥ येनगच्छतितत्तूर्णं
तद्वदामिमहीपते ॥ २७ ॥ दूर्वासाःसांप्रतंयत्रतपस्यग्रेव्यवस्थितः ॥ पापारिसिंझकेती

ब्राह्मण प्रसन्न झाला २४ आणि कांहीं वेळ विचार करून त्या राजाशीं भाषण करता झाला २५ असें पाहून राजा म्ह-णतो महाराज, जर आपण मला प्रसन्न झालां तर मला ह्या जलोदरापासून मुक्त करा २६ असें राजाचें भाषण श्रवण करून ब्राम्हण म्हणतो. राजा मी जो तुला शाप दिला तो कधींच व्यर्थ व्हावयाचा नाहीं. जलोदर तर तुला प्राप्त होणारच २७ परंतु या पासून तुझी शीघ्र मुक्तता होईल असा मार्ग सांगतो. दुर्वास ऋषि सांप्रत काळीं ज्या स्थानीं अ-

त्युग्र तप करीत आहे २८ त्या सिंदूर पर्वतावरील पापारि ह्या नांवाच्या तीर्थावर जा. त्या ठिकाणीं त्या दुर्वास ऋषीनें अद्‌भुत पराक्रम केला आहे. २९ जो पापारि तीर्थाच्या उदकानें स्नान करितो त्याचे व्याधि, पाप आणि दारिद्र्य हीं तत्काल नाश पावतात ३० ह्यांचा नाश क्रमानें होतो कृत व त्रेता ह्या युगांत तिहींचाही नाश होत असे. द्वापारांत अघव दारिद्र्यांचाच नाश होत असे आणि ३१ कलियुगांत त्या दुर्वास ऋषीच्या वचनानें केवळ पातकाचाच नाश होतो. तेव्हां तूं त्या पवित्र सिंदूर पर्वतावर जा ३२ पापारि तीर्थाचें स्नान करून पातकाला यमसदनाप्रत पाठीव. असें त्या

र्थेसिंदूरस्यसमीपत: ॥ २८ ॥ अत्यद्भुतंकृतंतेनतथाब्रह्मर्षिणानृप ॥ व्याधिंपापंदारिद्रंचतत्रस्नानेननश्यति ॥ २९ ॥ पापारिवारिणिस्नातित्रयंतस्यविनश्यति ॥ एकैकंहृयतेराजन्युगक्रमव्यपेक्षया ॥ ३० ॥ कृतेत्रेतेत्रयंनश्येद्वापरेचाद्यमंतिकम् ॥ कलौचकेवलंपापंदुर्वासोवचनान्नृप ॥ ३१ ॥ गच्छशीघ्रंमहाबाहोसिंदूराद्रिमकल्मषं॥ पापारिवारिणिस्नाहिपापंनययमक्षयं ॥ ३२ ॥ सिंधुरुवाच ॥ सिंदूरोविद्यतेकुत्रसनज्ञातोमयाविभो ॥ कादिशासाद्विजश्रेष्ठकियंतियोजनानिच ॥ ३३ ॥ एतत्सर्वंसमासेनयथावद्वक्तुमर्हसि ॥ त्रिवक्रउ० ॥ शतत्रयंयोजनानांदक्षिणाशामरिंदम ॥३४॥

त्रिवक्र ब्राह्मणाचें भाषण श्रवण करून पुनः राजा विचारितो—महाराज तो सिंदूर पर्वत कोठें आहे तो मी जाणत नाहीं ३३ तो कोणत्या दिशेला आहे किती योजनें लांब आहे, हें सर्व सविस्तर मला सांगा ३४ ब्राह्मण सांगतो—तो सिंदूर पर्वत ह्या नगरापासून दक्षिण दिशेस तीनशें योजनें ( १२०० कोश ) लांब आहे. विंध्य पर्वताच्या समीपच दक्षिण भागीं ३५ गौतमाश्रमाच्या आग्नेयीस, अगस्त्य ऋषीच्या आश्रमाच्या नैर्ऋतीस दुर्वास ऋषीचा पवित्र आश्रम आहे.

३६ त्या ठिकाणीं जा ह्मणजे तुझें कल्याण होईल. असें सांगून तो त्रिवक्र ब्राह्मण निघून गेला ३७ नंतर तो धुंधु राजा सर्व राज्य पुत्राच्या स्वाधीन करून, रक्षणार्थ त्याला प्रधानाचे स्वाधीन करून ३८ आपण तीर्थ यात्रेला योग्य असा मलिन वैराग्याचा वेष धारण करून, तत्काल जलोदरानें पीडित झाल्यामुळें हळूं हळूं दक्षिण दिशेच्या मार्गानें सिंदूर पर्वतावर जावयास निघाला ३९ तो जातां जातां क्षुधा आणि तृषा यांनीं पीडित होऊन, मार्ग क्रमणानें फारच

विंध्यस्यदक्षिणेपार्श्वेसमीपेनंदिवर्धनं ॥गौतमस्याग्नेयकोणेनैऋत्येकुंभजस्यवै॥३५॥
दुर्वासस्याश्रमंपुण्यंनृहितार्थमधारितत् ॥ मयातत्कथितंसर्वंगच्छतत्रसुनिश्चितं॥३६॥
इत्युक्कातस्यराज्ञोऽग्रेगतोऽसौभृगुनंदनः ॥अथाहूयात्मजंतेनधुंधुनाधर्मचारिणा॥३७॥
दत्वाराज्यंसुतंचाशुमंत्रिभ्यस्तंनिवेद्यच ॥ नृपःकंचुमादायनिर्गतोदक्षिणांदिशं॥३८॥
जलोदरंमहज्जातंसजगामशनैःशनैः॥क्षुत्पिपासार्दितःश्रांतोऽध्वानंश्रमकर्शितः॥३९
क्रमेणक्रमतःपंथाह्यतीतोवत्सरत्रयात्॥विंध्याचलमथोल्लंघ्यदक्षिणाशामनुव्रजन्॥४०॥
व्याघ्रपादाश्रमंप्राप्यतेनपृष्टोमहामुनिः ॥ राजो० ॥अस्यदक्षिणपार्श्वेऽद्रिःसिंदूरःकुत्र
तिष्ठति ॥ ४१ ॥ कथय स्वमहाभागपीडितस्यममप्रभो ॥ व्याघ्रपादउ० ॥ पश्यत्त्वमु
न्नतंशृंगंसिंदूरस्यनृपोत्तमं ॥४२॥ यत्दृष्ट्वापातकंनास्तिआयतोयोजनद्वयात् ॥ एव

कृश होऊन, अतिशय श्रांत होऊन तीन वर्षांनीं विंध्याचलावर गेला ४० आणि त्या पर्वताचें उल्लंघन करून दक्षिण मार्गी गेला. त्या ठिकाणीं व्याघ्रपाद नांवाच्या ऋषीच्या आश्रमांत जाऊन त्याला प्रश्न करिता झाला ४१ महाराज सिंदूर पर्वत कोणत्या दिशेस आहे आणि किती लांब आहे हें मला सांगा, मी फार श्रांत झालों आहे ४२ व्याघ्रपाद

सांगतो—राजा हें पहा त्या पर्वताचें अतिशय उच्च शिखर दिसत आहे, ज्याच्या दर्शनानें सकल पातकांचा नाश होतो, तो दोन योजनें ( ८ कोश ) लांब आहे ४३ हें त्या ऋषीचें भाषण श्रवण करितांच तो राजा त्या सिंदूर पर्वतावर गेला ४४ त्या पर्वतावर ऋक्, यजु, साम, अथर्व ह्या वेदांचे ध्वनि ऐकूं येत होते व तो पर्वत होम धूमानें व्याप्त होता ४५ तो सर्वत्र फलपुष्प युक्त वृक्षांनीं भरलेला, तो पापरहित, पर्वत कीं ज्या ठिकाणीं लोभादि दोष वास क-

मुक्तोद्विजेनाथनिर्गतोराजसत्तम: ॥ ४३ ॥ व्याघ्रपादाश्रमात्पुण्यात्प्रविवेशतपंगिरिं॥
बह्वृचाम्ऋग्यजुर्घोष:सुगतिंसामगायनं॥४४॥ आश्रावणैराभिचारैरंकितंहोमगंधिभि:॥
फलितंपुष्पितंरम्यमपापंसंगवर्जितं ॥४५॥ लोभादिदोषरहितंप्रसन्नाविपुलायतं॥कोऽ
हंकोऽस्मिक्वगंताचकिंकारणमकारणं ॥ ४६ ॥ अवस्थामीदृशींप्राप्यआत्मानंननुवि
स्मृतं॥नपृष्ट्वाकस्यचित्तेनऋजंगत्वास्ववेश्मवत्४७ पापारिवारितंदृष्ट्वानिवर्तित्वा
विनिर्गत: ॥ यावन्नालोकितंतेनतत्तीर्थसलिलंशिवं ॥ ४८ ॥ तावद्गत्वास्मृतिंलब्धा
संनिवृतंकथंमम ॥ पुनश्चासौनिवार्तित्वागत्वापापारिसंनिधौ ॥ ४९॥ दृष्ट्वातत्सलि
लंतेनविवृत्तेनसुदुर्लभं ॥ गत्वातत्रपुन:सोपलब्धसंज्ञोब्रवीदिदं ॥ ५०॥ राजोवाच०॥

रीत नाहींत, जो आनंदकारक असून भव्य ४६ अशा त्या पर्वताला पहातांच, मी कोण, कोठून आलों, कशासाठीं आलों, मला अशी अवस्था कां प्राप्त झाली ह्याचें त्याला कांहींच भान नाहींसें झालें ४७ नंतर आपल्या घरांत जसा प्रवेश करावा तसा कोणाला न विचारितां समोर पुढें गेला आणि पापारि तीर्थाचें उदक पाहतांच आनंद पावला ४८ त्या पवित्र उदकाचें दर्शन होतांच त्याला मी कोण, कशासाठीं आलों इत्यादि सर्व स्मरण झालें ४९ आ-

णि पुनः त्या तीर्थाकडे अवलोकन करून आनंदानें भाषण करूं लागला ५० हे पापारे तीर्थ राजा मी तुला शरण आलों आहे. माझें तूं रक्षण कर ५१ ह्या ठिकाणीं व्याधिताचा प्रवेश होणें कठीण, असें तो बोलत आहे इतक्यांत त्या ठिकाणीं एक मोठा चमत्कार झाला ५२ त्या राजाच्या उदरांत भयंकर गर्जना झाली त्यानें तो फार व्याकुल झाला आणि तत्काल त्याचें उदर फाटून ५३ त्यांतून, सरडे, बेडूक, कासव, आणि भयंकर सर्प हे बाहेर पडले ५४

शरण्योऽहंशरण्योहंपापारिब्रह्महेतुक॥प्रवेशोऽत्रनलब्धोऽयंप्राप्याहंव्याधितोभृशं॥५१॥
इदमंतरमासाद्यजातंतत्रमहाद्भुतं ॥ उदरेतस्यराज्ञोऽथगर्जितंयद्भयानकं॥५२॥आकुलं
व्याकुलीकृत्यभित्वाधाराविनिर्गता: ॥ कृकलासा:समंडूका:कर्कटा:शतभानना:॥५३॥
भूगमाफलमाच्छन्नाव्यालाश्चान्येविनिर्गता:॥उदरंचर्मनिर्विण्णंशोणितंनिर्गतंबहु॥५४
पपातमूर्छितस्तत्रनि:संज्ञ:सोऽभवत्तदा ॥ लब्धसंज्ञस्तत:सोऽपिउत्थायसहसाभृशं॥५५
उदरंनिस्तुषंजातंततोराजाव्रजप्तुन: ॥ सकंचुकोनिमग्नोसौपीततोयोयथाधृति:॥५६
समुक्तोव्याधिनापापैर्यथासर्पोहिकंचुकात्॥दृष्ट्वात्मानंविधूतंचनिरस्तंरोगपातकै: ५७

उदरांतून रक्त अतिशय वाहिलें. आणि तो मूर्छित होऊन भूमीवर पडला ५५ नंतर कांहीं वेळानें तो सावध होऊन आपलें पोट जलोदरानें ग्रस्त झालें होतें तें पूर्ववत् झालें असें पाहून आनंद पावला ५६ आणि कंचुकासहित त्या तीर्थीं स्नान करितांच जसा सर्प कंचुकापासून मुक्त होतो तसा सर्व पातकांपासून मुक्त झाला ५७ आपण पातकापासून मुक्त झालों असें पाहतांच तें कंचुक त्यानें पश्चिम दिशेस टाकिलें ५८ त्यानें जें कंचुक टाकिलें त्या ठिकाणीं कंचुक

ह्या नांवाचें तीर्थ झालें तें आनंदकारक आहे पूर्वी वल्कला ह्मणून जें तीर्थ सांगितलें तेथेंच हें कंचुक तीर्थ आहे. असो नंतर तो धुंधु राजा आनंदित होऊन दुर्वास ऋषीच्या दर्शनार्थ प्राप्त झाला. आणि त्या ठिकाणीं तीर्थ स्नान करून५९ ६० विधि पूर्वक रुद्रापासून झालेला जो दुर्वास ऋषी त्याप्रत वंदन करून भाषण बोलूं लागला—हे ब्रह्मर्षे तु-

प्रक्षाल्यकंचुकंतेनत्यक्तंवैपश्चिमांदिशं ॥ वल्कलायापुराप्रोक्ताकंचुकस्तत्रसस्मृतः॥५८॥
बहुवापितयोःप्राप्यसंगमोनंदिवर्धने ॥ दृष्टःपुष्टस्तदाधुंधुर्दुर्वाससमुपागमत् ॥ ५९ ॥
स्नानंकृत्वातुविधिवद्वंदनात्तत्रकार्तिके ॥ प्रणिपत्ययथान्यायंदुर्वासंरुद्रभूद्विजं ॥ ६०॥
धुंधुरु० ॥ त्वत्प्रसादाच्चब्रह्मर्षेमुक्तपापःक्षणादिह ॥ इदानींतत्रगच्छामियदिमेऽनुग्रह
स्तव ॥ ६१ ॥ कुरुष्वानुग्रहंनाथदासोऽहंतेनसंशयः ॥ इत्युक्त्वातंनमस्कृत्यजगामस्व
पुरंप्रति ॥ ६२ ॥ इतिश्रीपद्मपुराणेसिंदूरगिरिमाहात्म्ये नवमोध्यायःसमाप्तः ॥ ९॥

मच्या प्रसादानें मी आज क्षणमात्रांतच पाप मुक्त झालों ६१ आतां आपण जर माझ्यावर अनुग्रह कराल तर पुनः मी आपल्या घरीं जाईन. मी तुमचा दास आहे माझ्यावर दया करा ६२ असें बोलन पुनः त्याला साष्टांग वंदन करून त्याची आज्ञा घेऊन धुंधु राजा आपल्या नगरीं गेला. ६३ इति प० सिं० नवमोध्यायः समाप्तः९.

शंकर ह्मणतात, हे गिरिजे त्या पापारि तीर्थाच्या समीपच सर्व पातक्यांच्या पातकाचा नाश करण्याला समर्थ असें परम पवित्र एक कुंड आहे १ तें सर्व लक्षणांनीं युक्त असून चतुरस्र आहे आणि त्या कुंडाच्या खालीं निरंतर अग्नि प्रदीप्त झालेला असतो तो सर्व पातकांचा नाश करितो २ हें शिवाचें भाषण श्रवण करून पार्वती प्रश्न करिते महाराज त्या कुंडाच्या अधोभागीं जो अग्नि प्रदीप्त होऊन राहिला आहे तो तसा कसा राहिला आणि खालीं अग्नि प्रदीप्त झालेला असून त्याच्यावर उदक कसें राहिलें ३ ह्याचें मला अतिशय आश्चर्य वाटतें ह्या करितां तें आख्यान सविस्तर

ईश्वर०॥ संलग्नंतस्यतीर्थस्यकुंडमस्तिसुशोभनं ॥ दहनेपापिपापानांसमर्थंचातिपावनं ॥ १ ॥ लक्षितंलक्षणैर्वृद्धैश्चतुरस्रंप्रभाकरं ॥ अधस्थवन्हिराक्षिप्तोशुद्धंकुरुतेतुपापिनः ॥ २ ॥ पार्वत्युवा०॥ कस्मादधस्थितोवन्हिःकुंडेक्षिप्तइवप्रभो ॥ अधस्तंपावकंतत्रऊर्ध्वं तोयंप्रतिष्ठितं ॥ ३ ॥ तत्कौतुकंजगन्नाथतथ्यंमेब्रूहिशंकर ॥ शंकरउवा०॥ पुरातत्र तपस्तेपेक्रोधाग्निर्नामवैद्विजः ॥ ४ ॥ सहस्रैःषष्ठिभिर्वर्षैस्तपस्तत्तंभयावहं ॥ लोकत्रये ततोव्याप्तःप्रज्वलंतुहुताशनः ॥ ५॥ तपस्तेजभयाद्भीताइंद्राद्याःसुरसत्तमाः ॥ गत्वा विज्ञापयामासुर्ब्राह्मणंप्रपितामहं ॥ ६ ॥ इन्द्रउ० ॥ रसातलादिपातालंभूर्भुवस्वश्चवै

सांगा:–असें पार्वतीचें भाषण श्रवण करून शंकर सांगतात हे पार्वति पूर्वीं क्रोधाग्नि नामक ब्राह्मण त्या ठिकाणीं ४ साठ सहस्र वर्षेपर्यंत अत्युग्र तप करिता झाला तेव्हां त्याच्या तपाच्या योगें अग्नी उत्पन्न झाला व तो ज्वालांनीं सर्व त्रैलोक्य जाळूं लागला ५ तें पाहून इंद्रादि देव भयभीत होऊन ब्रह्मलोकीं जाऊन ब्रह्मदेवाप्रत विज्ञापना करिते झाले ६ इंद्र ह्मणतो हे ब्रह्मदेवा तूं हें ( अतल, वितल, सुतल, रसातल, तलातल, महातल आणि पाताल हे सात अ-

—द्या लोक आणि भूः भुवः, स्वः, महः जनः, तपः आणि सत्य हे सात ऊर्ध्व लोक मिळोन ) चतुर्दश भुवनात्मक ब्रह्मांड निर्माण केलेंस ७ तूं निरंतर आमचें रक्षण करीत असतोस कारण आह्मी तुला प्रिय आहों; मग आज कां त्याग करितोस, आह्मीं तुला शरण आलों आहों आमचें रक्षण कर ८ आज कोणाच्या तरी तपोग्नीनें सर्व लोक जळून जात आहेत तो तुझ्या सृष्टीला मानित नाहीं, मग ती सर्व भस्म होऊन गेल्यावर तूं कोणाचें रक्षण करणार? ९ तस्मात् ह्या कालीं रक्षण केलेंच पाहिजे. हें ऐकून ब्रह्मदेव इंद्राप्रत भाषण करितो:—हे इंद्रा ज्याच्या तपोग्नीनें सर्व जगत् संतप्त झालें आहे

प्रभो ॥ महर्जनस्तपस्तप्तंत्वयासृष्टंजगत्पते ॥ ७ ॥ त्वयाप्यभिमतंसर्वंत्यजसेत्वंक थंप्रभो ॥ त्वत्प्रतिष्ठावयंनाथत्राहिमांशरणागतं ॥ ८ ॥ अत्यद्भुतंतयातप्तंमन्यंतेन पितामह ॥ तेजसाच जितालोकाःपश्चात्किंकुरूषेविभो ॥९॥ एतदंतरमासाद्यलोका न्रक्षपितामह ॥ ब्रह्मो० ॥ कुत्रानेकस्तपस्तेपेव्याप्तंयेनजगत्त्रयं॥ १० ॥ तत्सर्वंब्रूहिम घवनयथात्वंममपृच्छतः ॥ इंद्रउ० ॥ क्रोधाग्निर्नामदेवेशतपस्तपतिवैद्विजः ॥ ११ ॥ उग्रेणतेजसातस्यव्याप्तंलोकत्रयंतव ॥ इतींद्रवचनंश्रुत्वासर्वलोकपितामहः ॥ १२ ॥ आगतःसर्वदेवैश्चऋषेस्तस्यसमीपतः ॥ ऊचेब्रह्मातर्तोवाक्यंतपस्त्वंसंहरेतिवै ॥ १३ ॥ स्वंस्वंविमानमारुह्यस्तुतिवादंप्रचक्रिरे ॥ अंतर्मुखस्तपोविप्रोऽसौबाह्यंकिंचिन्नविंदति

तो कोण आणि कोठें तप करीत आहे? १० हें सर्व मला सांग—इंद्र सांगतो हे पितामहा क्रोधाग्नि नामक ब्राह्मण अत्युग्रतप करीत आहे ११ त्याच्या तपोग्नीनें हें सर्व जगत् संतप्त झालें आहे हें इंद्राचें भाषण श्रवण करितांच ब्रह्मदेव १२ सर्व देवांसहवर्तमान त्या क्रोधाग्नि ऋषीच्या आश्रमीं प्राप्त झाला आणि हे ऋषे तूं हें अत्युग्र तप आतां पुरें कर १३ असें सांगून सर्व देवांसह स्व यानांतून त्याची स्तुति करूं लागाला, त्या कालीं तो ऋषि ध्यानस्थ होता यामुळें त्यास बाहेरचें कांहींच कळेना १४

पण सर्व देवांचा स्तुति शब्द श्रवण करितांच ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें त्याचें ध्यान विसर्जन झालें असें पाहून ब्रह्मदेव ह्मणतो हे ऋषे तुझें क्रोधाग्नी असें नाम प्रसिद्ध आहे ह्मणून तुला सांगतों कीं आह्मी जरी तुझ्या समाधीचा भंग केला आहे तरी तूं आमच्यावर क्रोध करूं नको; मी तुला प्रसन्न झालों आहे पाहिजे तो वर माग १९ हें त्याचें भाषण श्रवण करून क्रोधाग्नि ह्मणतो जर तूं मला प्रसन्न झालास आणि माझ्यावर अनुग्रह करावयास इच्छितोस तर १६ माझ्या शरीरांत जो क्रोधरूप अग्नि आहे तो काढून टाक; ह्या ऋषींच्या भाषणाला ब्रह्मदेवानें अनुमोदन दे

॥ १४ ॥ उद्बोध:स्तुतिवादेनआकृष्टोब्रह्मशासनात् ॥ वरंब्रूहिमहाभागअक्रुद्धमनसा किल ॥ १५ ॥ येनतेनामविख्यातंजातंहिविप्रसत्तम ॥ क्रोधाग्निरु ० ॥ यदितंदातुका मोवैअस्माकंप्रत्यनुग्रहं ॥१६ ॥तर्हिस्त्वंमच्छरीरस्थंक्रोधाग्नितमपाकुरु ॥ ऋषिणातेन संक्रोधादग्निंदेहस्थितंतदा॥१७॥ मनसानिर्मितेकुंडेचतुरस्रेगभीरके ॥ क्रोधाग्नितत्रसं क्षिप्तंवैपारित्यमुपस्थितम् ॥ १८॥ क्रोधोग्निंपतितंदृष्ट्वास्पृष्ट्वासव्येनपाणिना ॥ ब्रा ह्मणोदक्षिणेपाणौस्पृष्ट्वाग्निर्ज्वलतांगत: ॥ १९ ॥ तोयपूर्णंसुगंभीरंशुद्धंस्वादुमला पहं ॥ चतुरस्रंसुगंभीरंदृष्ट्वामुमुदिरेसुरा: ॥ २०॥ क्रोधाग्निरहितंविप्रंदृष्ट्वाशांतम गर्वितं ॥ निर्धूम;पावकोयद्वद्भवत्पूर्णाहुतिहुत: ॥ २१ ॥

तांच १७ तत्काल त्या ऋषीनें तपोबलानें एक चतुरस्र कुंड निर्माण केलें आणि त्यांत क्रोधाग्नीचें विसर्जन केलें १८ आणि तत्काल त्याला ब्रह्मदेवानें हस्त स्पर्श करितांच तो उदक रूप झाला १९ आणि त्या मधुर, पवित्र मनोहर आणि गंभीर अशा उदकानें तें चतुरस्र कुंड परिपूर्ण झालें असें पाहून सर्व देव आनंद पावले २० नंतर क्रोधाग्नीनें रहित तो ऋषि, जसा पूर्णाहुतीचें हवन झालें ह्मणजे धूम रहित असा अग्नि शोभतो तसा तो शांत झाला २१

असें पाहून ब्रह्मदेव संतुष्ट होऊन त्या प्रत भाषण करितात हे ब्राह्मणा आजपासून तुला शांतात्मा हें नाम मी दिलें आहे मी तुला प्रसन्न झालों आहे तर आणखी वर माग २२ ब्राह्मण ह्मणतो जरसर्व देवांसह वर्तमान तूं मला प्रसन्न झालास तर हें कुंड पापदाह ह्या नांवानें प्रसिद्ध व्हावें. २३ आणि ह्या माझ्या कुडांत, गुरुतल्पी, गोघाती, बालघाती, मत्सरी, अगम्यागमन करणारा, कपटी, २४ मद्यपी, कृतघ्न, आणि अशींच इतर महापातकें करणार सर्व लोक स्नान केल्यानें पवित्र व्हावे २५ तसेंच हुताशनीच्या दिवशीं जे ह्या कुंडीं स्नान करून सुवर्णादिदान, श्राद्ध, पिंडदान, पितृतर्पण

तथासंभाषितोविप्रोअक्रोधस्तोषसंयुतः ॥ ब्रह्मो० ॥ब्रह्मन्वृणिष्वदास्यामिशांतात्मात्वं हिनामतः ॥ २२ ॥ द्विजउ० ॥ यदितुष्टःसन्तिमेदेवब्रह्मेंद्राःससुरोत्तमाः ॥ नाम्नाभव तुकुंडंचपापदाहंचतन्मतं ॥ २३ ॥ ममकुंडेमहापापीगुरुतल्पिचमत्सरी ॥ गोघ्नोवाबा लघातीवाअगम्यागमनीशठः ॥ २४ ॥ क्रूरयोनिमद्यपीचकृतघ्नश्चविशेषतः ॥ एतेचा न्येचबहवःस्नात्वापूताभवंतिहि ॥ २५ ॥ हुताशनिदिनेप्राप्तेयःस्नातिविधिवन्नरः ॥ दा नंपिंडप्रदानंचश्राद्धंचपितृतर्पणं ॥ २६ ॥ यत्कृतंपापदाहेवैतत्सर्वंब्रह्मणोर्पणात् ॥पुरं दरपुरंप्राप्यसयातुब्रह्मणःपदं ॥ २७ ॥ तथेत्यूचुस्तदादेवाजग्मुस्तेचयथागतं ॥ शंकरउ०॥ क्रमात्प्रासंवरारोहेसंमुखांगीरिदक्षिणे ॥ २८ ॥ पुष्करंनामाविख्यातंत्रिषुलोकेषुपावनं॥ सर्वानद्यश्चतीर्थानिजलदाश्चतथानदाः ॥२९॥ नित्यंस्नातिपरोभक्त्यात्रिसंध्यंतत्प्रसाद

२६ करून जें ब्रह्मार्पण करितील तें सर्व अक्षय होऊन त्यानां ब्रह्मपद प्राप्त व्हावें २७ हें त्या ऋषीचें भाषण श्रवण करून, ‘ तथास्तु ’ असें ह्मणून ते सर्व देव आपापल्याठायीं गमन करिते झाले. शंकर सांगतात हे प्रिये पुढें त्या पर्वताच्या दक्षिण भागीं समोरच २८ त्रैलोक्यांत विख्यात व पावन असें पुष्कर ह्या नांवाचें तीर्थ आहे. त्या तीर्थावर भक्तिपूर्वक जो त्रिकाल स्नान करितो त्याला गंगा यमुनादिसर्व नद्या, सर्व तीर्थें संपूर्ण नद ह्यांचें स्नानाचें फलप्राप्त होतें

२९ हें ऐकून पार्वती प्रश्न करिते—पुष्कर हें तीर्थ हिमाचलावर तिसरें तीर्थ असून तें ह्या ठिकाणीं आहे असें आपण सांगतां ह्याचें मला फारच आश्चर्य वाटतें ३० तर तें तीर्थ ह्या पर्वतावर कां आलें, येण्याचें कारण काय हें सविस्तर मला सांगा ३१ शंकर सांगतात हे देवि ह्याचें कारण तुला सांगतो श्रवण कर—ज्या ज्या ठिकाणीं मोठमोठीं पवित्र तीर्थें असतात व तपःसंपन्न ऋषींचे आश्रम असतात त्या त्या ठिकाणीं जाऊन पापी लोक त्यांचें सेवन करून आपल्या पातकांचा त्याग करितात तें पातक त्या तीर्थावर राहतें ३२ ह्याचप्रमाणें पुष्कर तीर्थीं बहुत पातकांचा संचय झाला

रं ॥ पार्वत्युवा० ॥ हिमालयेचसद्वासंतृतीयंज्येष्ठपुष्करं ॥ ३०॥ आख्यातंतत्तुयत्के नअहोचित्रपदंयथा ॥ कस्मात्तत्रागतोसौवैतदित्याचक्ष्वसुरेश्वर ॥३१॥ महेश्वरउ०॥ शृणुदेविप्रवक्ष्यामितीर्थानिसकलान्यपि॥मुनीनामाश्रमंयांतिशुद्धंकुर्वंतियापिन: ३२॥ अनेनैवप्रकारेणपुष्करेसंचितंमलं ॥ अद्यभारार्दितंदृष्ट्वाआत्मानंपुष्करेणीह॥ ३३ ॥ नीत्वाविज्ञापितंचाथब्रह्माणंचतुराननं ॥प्रदक्षिणाभिवादंचस्तुतिंचक्रेनिवेद्यच ॥ ३४॥ पुष्करउवा० ॥ पापभारोमहज्जातस्त्रातारास्त्वामिहागत; ॥अस्माकंनास्तिचान्योवैयस्य गत्वानिवेदयेत् ॥ ३५ ॥ तस्मात्वंहिप्रजानाथनिग्रहेऽनुग्रहेक्षमः॥ प्रजापतिरु०॥जन्म प्राप्तोमहाविष्णुःपरित्राणायदेहिनां॥ ३६ ॥नारायणाख्यंयंप्राहु:शेतेयोहिपयोनिधौ॥ सजातोऽस्तिमहाभागसन्नागसहपर्वते ॥ ३७ ॥पुष्करउवा० ॥ नागार्जुनाभिधानंचकु

आणि त्या पातकानें तें भाराक्रांत झालें तेव्हां ३३ तें ब्रह्मलोकीं जाऊन ब्रह्मदेवाला प्रदक्षिणा व नमस्कार करून स्तुती करून प्रार्थना करितें झालें ३४ हे ब्रह्मदेवा माझ्या ठिकाणीं पातक्यांनीं आपलें अतिशय पातक आणून ठेविल्यामुळें मला फारच भार झाला आहे, मला आपलें दुःख निवेदन करावें असा तुझ्याशिवाय दुसरा कोणीच आश्रय नाहीं ३५ ह्मणून मी तुझी प्रार्थना करीत आहें. आतां निग्रह किंवा अनुग्रह करणें तुझ्याकडे आहे. हें त्याचें भाषण श्रवण करून ब्रह्मदेव ह्मणतो—प्राणिमात्रांच्या रक्षणार्थ महाविष्णूनें जन्म घेतला आहे ३६ ज्याला नारायण ह्मण-

तात, जो नित्य क्षीर समुद्रीं वास करितो, तो विष्णु नागार्जुन पर्वतावर वास करित आहे तिकडे तूं जा ३७ पुनः पुष्कराने प्रश्न केला, नागार्जुन हें कोणत्या पर्वताचें नांव आहे आणि तो कोठें आहे? ब्रह्मदेव सांगतात—विंध्य पर्वताच्या दक्षिण भागीं जो सिंदूर पर्वत आहे त्यावर पूर्वी नागार्जुन नामक ब्राह्मणानें अत्युग्र तप केलें ह्मणून त्यालाच नागार्जुन हें नाम आहे ३८ आणि तुला पापनाशन करणारी कथा सांगतों ती श्रवण कर—सूर्यवंशांत कमलपत्राक्ष भगवान् रामचंद्र उत्पन्न झाला आहे ३९ त्यानें स्वपराक्रमानें पुत्र पौत्रांसहित व सर्व राक्षसांसहित रावणाचा वध केला. तो तुझें पापापासून

## 

**ब्रचास्तिवदप्रभो ॥ ब्रह्मोवा० ॥ विंध्यस्यदक्षिणेभागेशृंगंतत्रैवदृश्यते ॥३८॥ नागार्जुनइतिख्यातोतपस्तपतिदारुणं ॥ शृणुध्वंपुष्करत्वंहिकथांपापौघनाशिनीं ॥ ३९ ॥सूर्यवंशसमुद्भूतोरामोराजीवलोचनः॥येनाहतोदशग्रीवःसपुत्रैःसहराक्षसैः॥ ४० ॥रक्षयिष्यत्यसौपापादवश्यंतेनसंशयः॥सयास्यतिमहावीरोधीरःसींदूरपर्वते ॥ ४१ ॥ गच्छतत्रसमातिष्ठरामस्त्वेतिःसलक्ष्मणः ॥ सहितोहनुमजासार्द्धंसीतयाचसुनिश्चितं॥ ४२ ॥ सिंदूरस्यवरेशृंगेसमीपेतिष्ठदक्षिणे ॥ स्वंगमिष्यतितत्रैववसिष्ठेनाभिनोदितः ॥ ४३ ॥ ब्रह्मणाप्रेरितस्तत्रआशुगत्वास्थिरोऽभवत् ॥ यस्त्वयापृच्छितंदेवितदिदंपुष्करंपरं॥ ४४ ॥इति श्रीपद्म पु० सिं० शांतात्माउपाख्यानेउमामहेश्वरसंवादेपुष्कराख्यानेदशमोध्यायः॥ १० ॥**

रक्षण करील ह्यांत संशय नाहीं ४० तो रामचंद्र, सीता, लक्ष्मण आणि हनुमान् ह्यांसह वर्तमान सिंदूर पर्वतावर येईल ४१ तेव्हां तूं माझ्या आज्ञेवरून त्या पर्वताच्या दक्षिणभागीं जाऊन वास कर ४२ रामचंद्रही वशिष्ठाचे आज्ञेनें त्या पर्वतावर खचित येईल आणि तुझ्या संपूर्ण पातकाचा नाश करील ४३ अशी ब्रह्मदेवाची आज्ञा होतांच तें पुष्कर त्या सिंदूर पर्वतावर जाऊन राहिलें. शंकर ह्मणतात हे देवी जें तूं मला पुष्कराचें कथानक विचारिलेंस तें हें मी तुला सविस्तर वर्णन केलें ४४ इति पद्म० सिंदू० शांतात्मोपाख्याने पु० म० दशमोध्यायः १० ॥

पुनः पार्वती प्रश्न करिते—रामचंद्र, सीता आणि लक्ष्मण ह्यां सहवर्तमान ह्या तपंगिरि पर्वतावर कां आला १ हें सविस्तर श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. जेथें जेथें रामचंद्राचें चरित्र वर्णन करितात २ तेथें तेथें तें रमणीयच असतें, व तें कोणाला बरें ऐकावेसें वाटत नाहीं. मला तर तें ऐकण्याची फारच उत्सुकता उत्पन्न झाली आहे ३ महादेव सांगतात—प्रिये युद्धांत सर्व राक्षसांसह वर्तमान रावणाचा वध करून, लंकेच्या राज्याचा बिभीषणाला राज्याभिषेक करून ४ रावणानें पीडिलेल्या सर्व देवानां आश्वासन देऊन, महासती जी सीता तिला पुनः मिळवून जागोजाग वानरांना अधि-

पार्वत्युवाच॥ कस्माद्रामोमहाबाहुःससीतोसहलक्ष्मणः ॥ कस्माच्चकारणात्तत्रआगतस्तंतपंगिरिं॥ १ ॥ विस्तरेणाहितच्छ्रोतुमिच्छामिचरितंविभो ॥ श्रूयतेयत्रयत्रैवचरितंराघवस्यच॥ २ ॥ सुरम्यंतत्ततत्रैवअहोकस्यनरोचते ॥ ब्रूहिब्रूहिमहादेवऔत्सुक्यंवर्ततेमम ॥ ३ ॥ ईश्वरउ० ॥ हत्वारणे दशग्रीवंससुतंबंधुभिःसह॥ अभिषिंच्यचलंकायांयोवराज्येबिभीषणं ॥ ४ ॥ आश्वास्यदेवताःसर्वाःसीतांप्राप्यमहासतीं॥ अभिषिंच्यकपीन्सर्वान्स्वेस्वेस्थानेविभागशः ॥ ५ ॥ पुनर्जगामसंहृष्टःस्वाम्पुरींप्रतितैःसह॥ आरूढाःपुष्पकंसर्वेप्राप्तास्तेनिमिषांतरात् ॥ ६ ॥ महोत्सवोमहान्जातःकृतस्तैःससुरैर्नरैः ॥ ददर्शभरतस्तत्रशत्रुघ्नश्चमहाबलः ॥ ७ ॥ राघवंतुनमस्कृत्यजानकींलक्ष्मणंतथा॥ वसिष्ठप्रमुखाविप्राराघवेणनमस्कृताः ॥ ८ ॥ प्रविवेशततोऽयोध्यांमदैर्गर्जंतिदिग्गजाः॥ देव

कारावर स्थापून, ५ पुष्पक विमानांत बसून मोठ्या आनंदानें रामचंद्र अयोध्येप्रत एका क्षणांत प्राप्त झाला, ६ ते वानर, मनुष्य, देव ह्या सर्वांस आनंद देत देत थोड्याच कालानें अयोध्येच्या समीप प्राप्त झाले ७ रामचंद्र प्राप्त झाले असें पाहून भरत आणि शत्रुघ्न यांनीं त्याला साष्टांग नमस्कार करून अनुक्रमानें सीता व लक्ष्मण ह्यांसही नमस्कार केला. नंतर वसिष्ठादि ब्राह्मणांस रामानें साष्टांग नमस्कार करून ८ त्यांचा सत्कार केला, नंतर रामचंद्र अयो-

ध्यैत प्रवेश करूं लागले या वेळीं दिग्गजांनीं गर्जना केली व स्वर्ग लोकीं देवांनीं दुंदुभि वाजविले, अप्सरा नृत्य करूं लागल्या, गंधर्व गान करूं लागले, ९ त्या रामचंद्राच्या स्वारींत इंद्र भालदार झाला होता. ब्रह्मदेव स्वतः 'कनिक्रदज्जनुषं' इत्यादि मंगलसूक्तांचा पाठ करीत होता. तसैंच इतर ब्राह्मण, ऋक्, यजु, साम ह्या वेदांचे मंगलकारक मंत्र ह्मणत होते १० ह्या प्रमाणें मोठ्या थाटानें रामचंद्र कौसल्येच्या मंदिरांत प्रथमतः प्रवेश करिते झाले, आणि त्या ठिकाणीं ११ जिचे प्राण कंठगत झाले आहेत, जिचा देह सुमित्रेनें सांवरून धरिला आहे, कैकेयी जिच्या पाठी

दुंदुभिवादित्रैर्नृत्यगीतैर्मनोहरैः ॥ ९ ॥ प्रतीहारीह्यभूदिंद्रोब्रह्माशांतिमगायत ॥ ऋग्यजुःसामनिघोषैःस्वस्तिकैर्मंगलैस्तथा ॥ १० ॥ महतासंभ्रमेणाथकौसल्यामंदिरंययौ ॥ पिचुमंदरवर्णाभंकौशल्यातंनिरीक्ष्यच ॥ ११ ॥सोऽप्यपश्यन्महाभागांकौशल्यांकंठजीवितां ॥ दत्ताधारंसुमित्राया:कैकेयींपृष्टत:स्थितां ॥ १२ ॥ अंत:पुरेसमायुक्तांजीर्णकंचुकसंमुतां ॥ भोगोपचाररहितांम्लानांम्लानाननांकिल ॥ १३ ॥ विसृज्यलक्ष्मणंतूर्णंपपातधरणीतले ॥ लुंठमानस्तदारब्ध:ससीतोसहलक्ष्मण: ॥ १४ ॥ उत्थापयत्तुसाराज्ञीकौशल्यामोहवेष्टिता ॥ पपातचरणोपांतेमोहव्याप्तेनचेतसा ॥१५॥ आलिंग्यकाष्ठवद्भूतोलयंगत्वापदेपदे ॥ चकारस्नपनंतस्या:पादयोश्चाक्षुषैर्जलैः॥ १६ ॥ वसिष्ठप्र

मागें बसली आहे १२ तशाच इतर दासी जिच्या आसपास बसल्या आहेत, जिनें शरीर संस्कारादिक सर्व आहार सोडिले आहेत, जिचीं वस्त्रें जीर्ण झालीं आहेत, जिचें मुख अगदीं निस्तेज दिसत आहे १३ अशा त्या मातेला पाहतांच सीता आणि लक्ष्मण ह्यांसह वर्तमान रामचंद्र तिच्या पायांवर लोळूं लागला व त्यास देहभान नाहींसें झालें १४ असें पाहून ती राज्ञी कौसल्या तत्काल वर उठून त्याला प्रेमानें घट्ट आलिंगिती झाली १५ आणि प्रेमानें सद्गदित होऊन रोदन करूं लागली, हें पाहून रामचंद्रानें आपल्या अश्रुधारांनीं तिचे चरणकमल भिजविले १६

तत्काल, वसिष्ठादि ब्राह्मण, 'ज्याच्या चरणांपासून उत्पन्न झालेली गंगा त्रैलोक्याला पवित्र करिते' १७ त्याच्या नेत्रांतून आश्रुधारा चालल्या आहेत! काय आश्चर्य हें' इत्यादि भाषणांनीं तिचें सांत्वन करितांच रामचंद्र स्वतीर्थावर येऊन तिला कुशल प्रश्न करिता झाला १८ नंतर तिनेंही कुशल प्रश्न केल्यावरून तिला आपलें कुशल निवेदन करून, जिनें अरण्यांत पाठविलें त्या मातेला (कैकेयीला) नमस्कार करून १९ तिचा मधुर भाषणांनीं सत्कार करून नंतर सुमित्रेला नमस्कार करून सर्व सापत्न मातांचा सत्कार केला २० ह्या प्रकारें तो- परस्पर भेटीचा समारंभ आटो-

**मुख्यैर्विप्रैस्तद्धृतंचप्रमार्जितं ॥ अस्यपादोद्भवागंगात्रिलोकांश्चपुनातिवै ॥ १७ ॥**
**निसृतंलोचनाभ्यांचतत्तोयंदेवदुर्लभं ॥ लब्धसंज्ञस्ततोराज्ञीमुवाचकुशलंप्रभु: ॥ १८ ॥**
**प्रत्युवाचमहाबाहुर्मातर्मेकुशलंकिल ॥ सप्रणम्यततोराज्ञींययाप्रस्थापितोवनं ॥१९॥**
**पूजितासामहाविद्यावाक्पुष्पैर्बहुभिस्तथा ॥ सुमित्रांचनमस्कृत्यमातृ:सर्वा:सपत्नय: ॥२०**
**वाक्यावसानेसंप्राप्तेकैकेयीवाक्यममब्रवीत् ॥ कैकेयीउ०॥ सुलग्नंवर्ततेतातवसिष्ठंप्रत्यु**
**वाचसा ॥२१॥ राज्येऽस्मिन्नभिषेकायश्रीरामस्यमहामुने ॥एतच्छ्रुत्वासमस्तैस्तुसाधु**
**साध्वितिभाषितं ॥ २२ ॥ उत्थायभरतस्तूर्णंवसिष्ठंप्रत्युवाचस: ॥ भरतउ०॥राज्यो**
**पकरणंकिंचिदानयामिमहामुने ॥ २३ ॥ प्रेषयस्वहिमांकर्तुंनिश्चितंवक्तुमर्हसि ॥**
**वसिष्ठउ० ॥ पुण्योदकानिसर्वाणिगंगासंभवनानिच ॥ २४ ॥ आनयत्वरितंवीरवि**

पतांच कैकेयी प्रसंगाला योग्य असें, आपले कुलगुरु जे वसिष्ठ त्यांप्रत भाषण बोलती झाली २१ गुरुजी रामचंद्र ज्या सुलग्नीं नगरांत प्रविष्ट झाला त्याच सुमुहूर्तावर रामचंद्राला राज्याभिषेक करावा अशी माझी इच्छा आहे २२ ह्या तिच्या भाषणाला सर्वांनीं मान डोलविली. तत्काल भरत वर उठला आणि वसिष्ठाप्रत बोलतो—गुरुजी रामचंद्राला राज्याभिषेक करण्याला जें साहित्य पाहिजे तें आणण्याची मला आज्ञा करा, २३ ह्मणजे मी क्षणमात्रांत सर्व सिद्धता करितों. वसिष्ट सांगतात, भरता, गंगा, गोदा, यमुना इत्यादि पुण्य नद्यांचीं उदकें विलंब न करितां शीघ्र घेऊन ये २४

तशींच दधि, अक्षत, लाज, दुर्वांकुर, आम्रपल्लव इत्यादि मंगल द्रव्यें शीघ्र संपादन कर, २५ अशी वसिष्ठाची आज्ञा होतांच भरत मोठ्या आनंदानें सर्व वानर सैनिकांनां दशदिशांप्रत पाठवून दोन घटिकेच्या आंत सर्व सिद्धता करिता झाला २६ ह्या प्रमाणें अभिषेकाची सर्व तयारी होतांच वसिष्ठ रामचंद्राप्रत ह्मणतात २७ हे रामचंद्रा! आतां आह्मी तुला राज्याभिषेक करणार त्याचा तूं प्रतीनें स्वीकार कर २८ हें कुलगुरु वसिष्ठाचें भाषण श्रवण करून रामचंद्र ह्मण-

लंबमाकुरुष्वहि ॥ मंगलानिचसर्वाणिद्रव्याणिकुरुसंनिधौ ॥ २५ ॥ वसिष्ठवाक्याद्भरतःसर्वाणिहिसमानयत् ॥ आज्ञप्तायूथयास्तेनसुप्रसन्नेनचेतसा ॥ २६ ॥ पुण्योदकादिकंसर्वंमुहूर्ताभ्यंतरेकिल ॥ विस्तार्यसकलंवस्तुस्तदाविज्ञाप्यराघवं ॥ २७ ॥ वसिष्ठउ०॥ राज्याभिषेकसमयोवर्ततेरामराजराट् ॥ स्वीकारंकुरुराजेंद्राधुनाराज्याभिषेचनं ॥ २८ ॥ श्रीरामउ०॥ भरतंकुरुराज्यत्वंअहंयास्येतपोवनं ॥ तीर्थयात्रांकरिष्यामिइदंराज्यंनमेहृदि ॥ २९ ॥ रामस्यवचनंश्रुत्वादेवाःसहरियोनयः ॥ गतजीवास्तदा सर्वेस्थिताश्चित्रमिवस्थिताः ॥ ३० ॥ आशापाशविनिर्मुक्ताःस्थिताविगतमानसाः ॥ चिंताक्रांताःकथंदेवोराज्यंरामःकरोतिवै ॥ ३१ ॥ तंदृष्ट्वारघुनाथोऽथवसिष्ठंप्रत्युवाचह ॥ सर्वैरनुगृहीतोऽस्मियद्यहंब्रह्मणासह ॥ ३२ ॥ ❀ ❀ ❀ ❀ ❀ ❀

तात—गुरुजी राज्याभिषेक भरताला करा. मी तपोवनांत जातों मला हें राज्य मुळींच रुचत नाहीं २९ हें भाषण देवांस फारच विप्रिय झालें आणि ते चित्रासारखे जागच्या जागीं स्तब्ध राहिले. ३० व निराश झाले व त्यांस आतां हा रामचंद्र राज्य कसें करण्यास प्रवृत्त होतो ह्मणून चिंता पडली ३१ हें पाहून राम वसिष्ठाप्रत बोलतात—सर्वांचा जर माझ्यावर अनुग्रह आहे व राज्य करण्याविषयींही सर्वांचाच जर आग्रह असेल ३२

तर आपल्या आज्ञेप्रमाणें मी राज्य करण्यास सिद्ध होईन, हें भाषण ऐकून वसिष्ठ ऋषि ३३ सर्वांच्या समक्ष विश्वामित्राजवळ आले, आणि आपला अभिप्राय निवेदन केला, तें ऐकून विश्वामित्र भाषण करितो ३४ रामचंद्रा तूं मनांत कांहीं संशय न करितां प्रजेचें पालन कर, वीर असून जो असा रडतो तो राज्यपद पावत नाहीं ३५ रामचंद्रा राज्याविषयीं तुझें मनांत कोणती शंका आली आहे तें सांग, तिचें मी निवारण करितों ३६ रामचंद्र ह्मणतो महाराज सर्वांची जर माझ्यावर कृपा आहे तर मी आपल्या आज्ञेप्रमाणें राज्य करितों परंतु मी बोलतों हें श्रवण

याचयिष्यामियद्युष्मान्तत्तथामेभविष्यति ॥ राघवस्यवचःश्रुत्वावसिष्ठोमुनिपुंगवः ॥ ३३ ॥ आययौकौशिकंशीघ्रंसर्वेषांपश्यतांतदा ॥ वसिष्ठस्यमतंज्ञात्वाविश्वामित्रोब्रवीद्वचः ॥ ३४ ॥ नकार्यःसंशयोरामसर्वेषांप्रतिपाल्यतां ॥ एवंरोदितियोवीरोऽसराजानभविष्यति ॥ ३५ ॥ रावणारेवदस्वात्रयत्तेमनसिवर्तते ॥ ततेऽहंकारयिष्यामितवानुज्ञांचराम्यहं ॥ ३६ ॥ श्रीरामउवाच ॥ अस्मासुयदियुष्माकंकारुण्यंवर्ततेद्विज॥ करोमिराज्यंतत्राहंशृणुध्वंतद्ब्रवीमिवः ॥ ३७ ॥ अथकिंबहुनोक्तेनवाक्यवादमलंबहु ॥ यासंपत्तिर्ममगृहेभविष्यतिदिनेदिने ॥ ३८ ॥ चांडालानांहिसर्वेषामितिमेनिश्चितंमतं ॥ भवंतुसर्वेविरजोदुःखंकोपिनपश्यतु ॥ ३९ ॥ यावद्राज्यंकरिष्यामितावत्सौख्यंभवत्विति ॥ ब्रह्मणासहसर्वेऽपिप्रत्यूचुस्तेमुदान्विताः ॥ ४० ॥ श्रीमुखान्निर्गतंसत्यं

करा ३७ पुष्कळ बोलण्यांत काय अर्थ थोड्यांत सांगतों कीं निरंतर माझ्या घरीं जी संपत्ती असेल ती ३८ चांडालापर्यंत सर्व वर्णांच्या घरीं निरंतर राहावी असें मी इच्छितों. तसेंच सर्वांनीं क्लेशरहित असावें, दुःख कोणालाच प्राप्त होऊं नये ३९ मीं जों पर्यंत राज्य करीन तों पर्यंत सर्व प्रजेला ह्या प्रमाणें सुख होवो. हें श्रवण करून ब्रह्मदेवादि सर्व देव आनंदित होऊन ४० 'हे रामा आपल्या श्रीमुखांतून जें वाक्य निघालें तें खरें असो आणि सर्व प्रजेला

अतुल सौख्य, सुभिक्ष आणि परस्पर प्रीति प्राप्त होवोत ४१ असें प्रत्युत्तर देते झाले. आणि सर्वांनीं अभिषेक करण्याच्या जागीं सीतेसहित रामचंद्राला नेलें ४२ तेव्हां कैकेयीनें स्वतः आपल्या हस्तानें रामचंद्राच्या जटा सोडिल्या, आणि रामचंद्राच्या वनवासामुळें भरत, लक्ष्मण आणि शत्रुघ्न ह्यांनींही जटा वाढविल्या होत्या त्या रामानें आपल्या हातानें सोडिल्या ४३ आणि आपण तापस वेष सोडून स्नान करिता झाला. नंतर ह्या सर्वांनीं रत्नालंकार धारण केले ४४ रामचंद्राच्या अंग स्पर्शानें ते सर्व तद्रूप दिसूं लागले. ज्या ठिकाणीं साक्षात् आदि नारायण रामचंद्र रूपा-

तत्तथास्त्वित्यरिंदम ॥ सर्वेषांसौख्यमतुलंसुभिक्षंचसुभाषितं ॥ ४१ ॥ इत्युक्त्वासह
सोत्तस्थु:सर्वेदेवा:सवासवा: ॥ यज्ञाभिषेकभवनंनीत्वारामंसमैथिलं ॥ ४२ ॥ जटा
मुक्ति:कृतातत्रकैकेय्यास्वकरेणतु ॥ स्वहस्तेनाथरामेणभरतादित्रयंक्रमात् ॥ ४३ ॥
विसृज्यतापसवेषंअभिषेकंचकारवै ॥ अलंकृतास्तदासर्वेरत्नजै: कनकादयै: ॥ ४४ ॥
रामांगसंगसंपर्कात्तद्रूपास्तेतदाभवन् ॥ नारायण:स्वयंरूपीयत्रतिष्ठतिकालिके ॥ ४५॥
अयोनिसंभवालक्ष्मी:सीताभूत्वावतारिता ॥ तत्रकिंवर्णयिष्यामिस्त्रीरत्नंयद्वदंतिच ४६
अभिषिंच्यमहाराज्येस्फुर्व्वितोदेवदुंदुभि: ॥ वादित्रशब्दनिर्घोषैर्घंटातालपटादिभि: ॥ ४७
शारदागायनंचक्रेकंबलाश्वतरोरगा: ॥ नारदोनृत्यतेतत्रहृष्टस्तत्रमुदाहसन् ॥ ४८ ॥

नें प्रकट झाला आहे ४५ तशीच आदिमाया महालक्ष्मी अयोनि संभव सीतेच्या रूपानें प्रकट झाली आहे, जिला स्त्रीरत्न असें ह्मणतात, तेथील वर्णन करावयास कोण समर्थ आहे? ४६ रामचंद्राला राज्याभिषेक होऊं लागला तेव्हां देवांनीं दुंदुभि वाजविले, तशींच शंख, भेरी, पटह इत्यादि अनेक मंगल वाद्यें वाजूं लागलीं ४७ शारदा गान करूं लागली. कंबल, अश्वतर इत्यादि सर्प त्याला अनुमोदन देऊं लागले. नारद मोठ्या आनंदानें नृत्य करूं लागला ४८

तशाच उर्वश्यादि अप्सरा व देवकन्या नृत्य करूं लागल्या आणि गंधर्व गान करूं लागले. कौसल्येनें मोठ्या आनंदानें ओंवाळणी केली. ४९ अरुंधती, अनसूया, ब्रह्माणी, अदिति, लोपामुद्रा, मैत्रेयी, तशाच इतर राजकन्या, ५० दधि, अक्षत, दूर्वांकुर, ह्यांची वृष्टि करित्या झाल्या ब्राह्मणांनींही मस्तकावर मंत्राक्षतांची वृष्टि केली ५१ नंतर सर्व देवांची रामचंद्रानें पूजा केल्यावर ते आपापल्या स्थानीं गेले. तसेंच ऋषीहि आपल्या आश्रमीं गेले.५२ बिभीषण आणि सुग्रीव ह्यांनां वस्त्रालं-

नृत्यंतिदेवकन्याश्चरंभाद्याःसुरनायका: ॥ नीराजनंचकाराशुकौशल्यापरयामुदा ॥४९
अरुंधत्यनुसूयाचब्रह्माणीचसहादितिः॥लोपामुद्राचमैत्रेयीअन्यास्ताराजकन्यकाः॥५०
अक्षतादधिदूर्वाश्चप्रतिष्ठामंत्रसंयुता: ॥ ललाटेशिरसिन्यस्यसीताराघवयोर्द्विजै: ॥५१॥
संपूजितास्तदादेवा:सर्वेचनिलयंगता: ॥ स्वाश्रमंऋषय:सर्वेप्रेषितास्तेनसुंदरि ॥५२॥
बिभीषणश्चसुग्रीवोदानमानैस्तुतोषितौ ॥ प्रस्थापितौचसंहृष्टौदक्षिणाशांप्रजग्मतु:५३
आहूयवायुपुत्रंतंनिस्पृहंकारणेक्षमं ॥ आलिंग्योत्संगमादायाब्रवीद्गद्गदयागिरा ॥ ५४
अस्माकंनास्तितद्वस्तुयद्दत्वातेऽनृणीह्यहं॥तथापिमानिनोमानंदेयमात्मानुसारत: ५५
इत्युक्त्वाराघव:सीतामाहूयसत्वरंतदा ॥ स्कंधेकृत्वाविमानंतंनरयानंचतावुभौ ॥५६

कार देऊन सत्कार करून त्यांस आपल्या स्थानीं पाठविलें ५३ नंतर आपल्या सेवेविषयीं दक्ष व निःस्पृह अशा मारुतीला दृढआलिंगन देऊन त्याप्रत सद्गद होऊन रामचंद्र भाषण बोलते झाले ५४ हे मारुते, मला ह्या भूमंडलावर अशी कोणचीच वस्तु दिसत नाहीं कीं जी तुला देऊन मी तुझ्या ऋणांतून मुक्त होईन; तथापि मानयोग्य पुरुषाला स्वशक्त्यनुसार मान दिलाच पाहिजे. ५५ असें बोलून सीता आणि आपण मिळून उभयतांनीं स्कंधावर विमान घेतलें ५६ आणि मारुतीला

सांगतात हे मारुते ये, या विमानांत बैस. तुझ्या सारखा मान्य पुरुष मला ह्या भूमंडलावर दुसरा कोणीच दिसत नाहीं ५७ तें पाहून मारुतीनें त्या वाहनाला साष्टांग नमस्कार केला आणि प्रेमानें सद्गदित होऊन बोलू लागला, ५८ महाराज मी आपला सेवक असून आपण हें काय करितां असें ह्मणून त्यांच्या स्कंधावरून पालखी खालीं उतरवून ५९ त्या उभयतांस दिव्य सिंहासनावर बसवून साष्टांग नमस्कार करून क्षमा मागून ६० भक्तीनें नम्र होऊन भाषण बोलता झाला—महाराज, जर

एहिएहिमहावीरआरुह्यात्रहरीश्वर ॥ नत्वयासदृशोमानोयानंकिंबहुशोमहत् ॥५७॥
तंदृष्ट्वावायुपुत्रेणधृतंयानंनमोऽकरोत् ॥ सप्रेमंरामवीरेतिब्रूतेस्नेहपरिप्लुतः ॥ ५८ ॥
अहंतेऽनुचरःस्वामिन्किंकरोमिजगत्पते ॥ धृत्वातयोर्विमानंतत्प्रक्षिपेद्धरणीतले ॥५९
ततस्तौदंपतीतेनहरिणाभाषितौभृशं ॥ उपवेश्यासनेदिव्येप्रणिपत्यक्षमापितौ ॥ ६०
तदाप्रोवाचवचनंभक्त्याचविनयेनच ॥ मयाविनामहत्कार्यंनकर्तव्यंनृपोत्तम ॥ ६१
यदिमेप्रीतिकर्तात्वंनिश्चयेनरघूत्तम ॥ यन्मयाकल्पितंराजन्उभयोःप्रीतिकारणं ॥ ६२
अवधार्यवचस्तस्यसीतयासहराघवः ॥ ददौतस्मैकपींद्रायहारकुंडलकंकणं ॥ ६३ ॥
उत्पद्येतयदास्माकंकार्यंनूनंहरीश्वर ॥ आगंतव्यंस्मृतःशीघ्रंस्वाश्रमंगच्छवानर ॥ ६४ ॥

आपण माझ्यावर प्रीति करितां तर कोणतेंच महत्कार्य माझ्या वांचून आपण करूं नये ६१ मी जी आपली सेवा केली ती केवळ आपल्या प्रीतीकरितांच केली, त्याबद्दल मी बक्षीस इच्छीत नाहीं. ६२ असें त्याचें भाषण ऐकून त्याला एक मौक्तिकांचा हार आणि रत्नजडित सुवर्ण कंकणें व कुंडलें देऊन ६३ बा मारुते जेव्हां आह्मांला संकट प्राप्त होईल तेव्हां स्मरण करितांच तूं प्राप्त हो, असें सांगून त्याला स्वस्थानीं जाण्याला आज्ञा दिली ६४

नंतर कांहीं कालानें लवणासुराचा नाश करण्यासाठीं शत्रुघ्नाला मथुरेप्रत रामचंद्रांनीं पाठविलें ६५ त्यानें त्या दैत्याला मारून सर्व पृथ्वी निर्भय केली. नंतर सर्व प्रजा शोकरहित चिरकाळ आनंद पावत्या झाल्या ६६ सर्व प्रजा निरंतर आनंदित, पृथ्वी निरंतर धनधान्य समृद्धीनें संपन्न झालेली अशी झाली. शंकर सांगतात प्रिये पार्वति फार काय सांगू

कपिंप्रेष्यततोराम:शत्रुघ्नंमथुरांप्रति ॥ प्रेषयामासवीरोऽसौशत्रुर्हिंसनकारणात् ॥ ६५
जघानलवणंदैत्यंनिर्भयापृथिवीकृता ॥ प्रजा:सर्वा:सुहृष्टाश्चअशोका:सुस्थिताश्चिरं॥ ६६
अपादिष्टासुमुदिता:पृथिवीसफलासदा ॥ किंवर्णयामितद्राज्यंनभूतम्नभविष्यति ॥ ६७
इतिश्रीपद्मपुराणेसिंदुरागिरिमाहात्म्येएकादशोध्याय:समाप्तः ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

रामराज्या सारखें प्रजेलासुख कारक राज्य पूर्वीं झालें नाहीं व पुढें होणें नाहीं. ६७ इति श्री पद्मपुराणें सिंदूरागिरिमाहा-त्म्ये एकादशोध्याय: समाप्त: ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

शंकर सांगतात हे पार्वति ह्या प्रमाणें रामचंद्र राज्य करीत असतां बहुतकाल स्वस्थपणें लोटला, पुढें एक अद्भुत चमत्कार झाला तो असा १ त्याच्या राज्यांत पंथा ह्या नांवाचा ब्राह्मण असे, त्याचा पुत्र एके दिवशीं एकाएकीं मरण पावला, प्रातःकाल होतांच ब्राह्मणानें मृतपुत्राचें शव राजद्वारीं आणून ठेविलें २ इतक्यांत नागरिक जन काय आहे ह्मणून येऊन पाहतात तों सर्व दुःखित होऊन ३ ' प्राण्यांचा संहार करणारा मृत्यु ह्मणून कोणी आहे असें आपण ऐकतों तो नष्ट हा त्याचें हें कृत्य ४ असें ह्मणून अतिशय भययुक्त होऊन त्या ब्राह्मणपुत्राच्या शवाच्या हस्तपादादि अ-

ईश्वरउ० एवंचकारराज्यंससुखेनरघुनंदनः ॥ बहुकालोगतोदेविकिंचिदुत्पन्नमनन्तरम् ॥ १ ॥ पंथानाम्नाद्विजःकश्चित्तस्यपुत्रोमृतस्तदा ॥ ब्राह्मणोऽथगृहीत्वातंरामद्वारेनिधायच ॥ २ ॥ समागतावरारोहेनरानगरवासिनः ॥ किमिदंकिमिदंब्रह्मन्वदंत्येवंसुदुःखिताः ॥ ३ ॥ श्रूयतेऽथपरोमृत्युर्जंतुसंहारकारकः ॥ अहोबतमहाकष्टंनष्टःकोपिन दृश्यते ॥ ४ ॥ एवंवदंतितेसर्वेभयभीतामुहुर्मुहुः ॥ सर्वेप्रेतंप्रमृशंतोविग्लयंतिविमोहिताः ॥ ५ ॥ मध्यान्हेभोज्यवेळायांसंप्राप्तेतदनंतरं ॥ अभ्यंतरेमहाराजोदेवपूजांकरोतिवै ॥ ६ ॥ नित्यदानंरवेरर्घ्यंकृत्वाधेनुप्रदक्षिणां ॥ मौनंविसृज्यपप्रच्छप्रतिहारींरघूत्तमः ॥ ७ ॥ किंबहिर्वर्ततेपश्यपुनरेहिममांतिकं ॥ निर्गतोहिबहिःप्रतीोदृष्ट्वातंब्राह्मणंशुभं ॥ ८ ॥ अश्रुपूर्णमुखंदीनंप्रलपंतंमहारवं ॥ निवृत्यसोऽपितच्छीघ्रंनृपंविज्ञाप्यराघवं ॥ ९ ॥ कथितंचमहानिष्टंतछ्रुत्वानिर्गतःस्वयं ॥ वसिष्ठोनारदस्तत्ररामेणसह

वयवांस स्पर्श करून शोक करूं लागले ५ इकडे रामचंद्र प्रातःकालीन स्नान, संध्यावंदन, अग्निहोत्रहोम, देवपूजा ६ नित्यदान, सूर्याला अर्घ्यदान, धेनु प्रदक्षिणा इत्यादि नित्यविधि आवरून मौन विसर्जन करून द्वार प्रदेशीं येऊन पाहतात तों पुढें लोक समूह पुष्कळ जमला आहे असें पाहून द्वारपालाला आज्ञा करिते झाले कीं ७ बाहेर काय होत आहे हें पाहून मला सत्वर येऊन सांग. तत्काल तो सेवक बाहेर गेला आणि पाहतो तों ८ कोणी एक ब्राह्मण अत्यंत दुःखित होऊन उच्च स्वरानें रोदन करून मरण पावलेल्या पुत्राविषयीं शोक करीत आहे. ते पाहून पुनः राजाजवळ येऊन सर्व वृत्तांत निवेदन करिता झाला ९ तें भयंकर वर्तमान श्रवण करून रामचंद्र स्वतः त्या ठिकाणीं

गेले त्यांच्या बरोबर वसिष्ठ आणि नारद हेही गेले १० ब्राह्मणाला दुःखित पाहून रामचंद्र अत्यंत दुःखित होऊन ह्मण-तात हे ब्राह्मण श्रेष्ठा मी किंवा तूं असें काय पातक आचरण केलें ११ कीं ज्याच्या योगानें हा तुझा पुत्र यमसदनी गेला. हें ऐकून ब्राह्मण ह्मणतो उत्तम वर्णांपासून अगदीं चांडालां पर्यंत सर्व वर्णांला १२ तुझ्या राज्यांत अकालीं मृत्यु नाहीं असें असून माझाच पुत्र कां मरण पावला? ह्या संकट समयीं तूं माझें रक्षण कर १३ हें ब्राह्मणाचें भाषण श्रवण करून रामचंद्र नारदाप्रत भाषण करितात—नारदमुने असें माझ्या राज्यांत कसें झालें १४ ब्राह्मणाचा पुत्र कां मरण पावला ह्याचा विचार करून सत्वर मला सांग १५ नारद ह्मणतात रामचंद्रा तुझ्या राज्यांत वर्ण धर्मांचा संकर झाला आहे,

जग्मतुः॥१०॥दृष्ट्वारामोद्विजंप्राहबाष्पाकुलितलोचनः॥किंमयाचरितंपापंत्वयावाद्वि जसत्तम ॥११॥ येनपापेनबालोऽयंगतोवैवस्वतालयं॥ब्राह्मणउ०॥आचंडालांत्यजाःशूद्रा स्त्रयोवर्णानुलोमजाः ॥ १२ ॥ एतेषांमरणंनास्तिमत्पुत्रोऽयंमृतःकथं ॥ एवंवदत्यसौ विप्रस्त्राहित्राहीतिराघव ॥ १३ ॥ ब्राह्मणस्यवचःश्रुत्वारामःप्रपच्छनारदं॥ श्रीरामउ० कथमिदंसमुत्पन्नंमद्राज्येमुनिसत्तम ॥ १४ ॥ कारणंकिंसमुद्दिश्यद्विजसूनुर्मृतोह्यसौ॥ विचार्यतत्वतःशीघ्रंकथयस्वममप्रभो ॥१५॥ नारदउ०॥ संकरोवर्णधर्माणांअधर्मेच रतिर्नृप ॥ तपस्तपतिशूद्रस्तुयेनचोत्पद्यतेभयं ॥ १६ ॥ वृद्धौचमातृपितरौवर्ततेपुत्रस न्निधौ ॥ क्षुत्पिपासार्दितौदृष्ट्वातंपुत्रंदंडयेन्नृपः ॥ १७ ॥ वर्णाश्रमरताःसर्वेप्रचलंति कचिद्यदि ॥ तत्सर्वंरक्षयेद्राजाअन्यथादृश्यतेभयं ॥ १८ ॥ शास्त्रंदृष्ट्वापिशूद्रोऽपिअ विचार्यश्रुतिंपठेत् ॥ तेनपापेनराजावैप्राप्नोतिसुमहद्भयं ॥ १९ ॥ नयजंतिद्विजायज्ञं यस्यराष्ट्रेनरोत्तम ॥ द्वितीयवर्षेतद्राज्येअनिष्टंप्राप्यतेध्रुवं ॥ २० ॥ अन्यंनास्तिमहारा

कारण कोणी एक शूद्र अत्युग्र तप करीत आहे, त्या पासून हें विघ्न प्राप्त झालें आहे १६ रामा, राजधर्म असा आहे कीं माता पितर वृद्ध असून क्षुधा व तृषा ह्यांनीं पीडित होत असूनही पुत्र जर त्यांची सेवा करणार नाहीं तर त्याला राजानें दंड करावा १७ तसेंच कोणी आपला वर्णाश्रमधर्म सोडून यथेष्ट आचरण करूं लागेल तर तत्काल राजानें त्याला दंड करून पुनः पूर्ववत् वर्णाश्रम धर्माविषयीं प्रवृत्त करावा. असे न केल्यास राजाला मोठें भय प्राप्त होतें १८ शास्त्रमा-हित असून ही जर शूद्र अविचारानें वेद पठनकरील तर त्या पातकाच्या योगानें राजाला मोठें भय प्राप्त होतें १९ ज्या

च्या राज्यांत ब्राह्मण यज्ञ करीत नाहींत त्या राजाला एक वर्षाचे आंत मोठें भय प्राप्त होतें २० असा अनर्थ प्राप्त होण्याला ह्या शिवाय कांहीं कारण दिसत नाहीं. तस्मात् हे राजा तूं आपल्या सर्व राज्यांत शोध करून पहा २१ तूं ह्याचा शोध कर ह्या ब्राह्मणाला आश्वासन दे व त्या शूद्रास दंड कर. असें सांगून नारद आकाश मार्गानें निघून गेला २२ नंतर त्याच ठिकाणीं रामानें मारुतीचें स्मरण केलें. तत्काल तो महापराक्रमी वायुपुत्र वायुवेगानें क्षणमात्रांत त्या ठिकाणीं प्राप्त झाला २३ आणि रामाला साष्टांग नमस्कार व प्रदक्षिणा करून नम्रतेनें भाषण करिता झाला २४ महाराज काय आज्ञा आहे, काय करूं, कोठें जाऊं, कोणत्या कारणास्तव माझें स्मरण केलें, महाराज हा दास सिद्ध आहे, आज्ञा करा २५

जधर्मशास्त्रविचारणे ॥ तस्मात्त्वंचनृपश्रेष्ठपश्यराज्योद्भवंकिल ॥ २१ ॥ देहिविप्रायाभयंत्वंचारान्क्षिप्रंप्रसारय ॥ इत्युक्त्वासहसोत्थायनारदेगगनंगते॥ २२ ॥ ततस्तुराघवस्तत्रस्मृत्वातंहरिपुंगवं ॥ प्राप्तोऽसौवायुवेगेनहनुमान्वैमहाबलः ॥ २३ ॥ सव्यंकृत्वाभिवाद्यांघ्रीन्रामंचसहलक्ष्मणं॥ पश्चादुवाचवचनंसधर्मंसहसामलं ॥ २४ ॥ हनुमानु० किंकरोमिक्वगच्छामिकिंकार्यंकरवाण्यहं॥ आज्ञापयस्वमांस्वामिन्दासोऽहंतेनसंशयः ॥२५॥ श्रीरामउ० ॥ क्षणंतिष्ठमहाभागआज्ञांदास्येनसंशयः ॥ प्रस्थापयित्वाभ्रातॄन्वैप्रागुदीचींचपश्चिमां ॥ २६ ॥ भरतंलक्ष्मणंचैवतृतीयंलवणांतकं ॥ विषयंवीक्ष्ययत्नेनधर्माधर्मौनृपात्मजाः ॥ २७ ॥ शीघ्रमागम्यतांसर्वैवार्तांविज्ञाप्ययत्नतः ॥ दशरात्रादधःपश्चाद्गंतव्यंदक्षिणांदिशं ॥ २८ ॥ निर्गतास्तुत्रयोवीराःस्वरथैरायुधैर्गजैः ॥ प्रत्युवाचद्विजंतत्ररामःसत्यधुरंधरः॥ २९ ॥आकर्णयस्वभोविप्रप्रतिज्ञांमेदुरासदां ॥ जीवनंतेसुतस्यास्यददामियमशासनात् ॥ ३० ॥

हें त्याचें भाषण श्रवण करितांच रामचंद्र ह्मणतात बा मारुते मी तुला आज्ञा करितोंच, पण क्षणमात्र धीर धर नंतर तीनही बंधूस पूर्व, उत्तर आणि पश्चिम ह्या दिशांस जावयास आज्ञा केली २६ भरत, लक्ष्मण आणि शत्रुघ्न ह्यांस, पूर्व, उत्तर आणि पश्चिम ह्या दिशांस जाऊन सर्व देशांत बारकाईनें चौकशी करून धर्म, अधर्म जाणून २७ शीघ्र दहा दिवसांचे आंत परत या. आणि सर्व वर्तमान मला निवेदन करून पुनः दक्षिण दिशेस जा अशी आज्ञा केली २८ नंतर ते तिघे वीर रथारूढ होऊन शस्त्रास्त्रें घेऊन तीन दिशांप्रत गज व सैनिक घेऊन गेले. इकडे रामचंद्र त्या ब्राह्मणाप्रत भाषण बोलतो २९ हे ब्राह्मणा मी दुस्तर प्रतिज्ञा करितों ती ऐक तुझ्या यमलोकीं गेलेल्या पुत्राला मी परत आणून देईन ३०

जर माझ्याकडून असें न घडेल तर मला उत्तम गति प्राप्त होणार नाहीं आणि तुझा पुत्र जिवंत होई पर्यंत मी अन्नोदक सेवन करणार नाहीं ३१ आतां तूं हें पुत्राचें कलेवर घेऊन भार्येसह घरीं जा. दुःख करूं नको. मी तुझ्या पुत्राला जिवंत करितों. ३२ असें रामचंद्राचें भाषण श्रवण करितांच तो ब्राह्मण पुत्राचें शव अंकीं घेऊन घरीं गेला. नंतर नेमलेल्या दिवशीं ते तिघे भाऊ तीनही दिशांचा शोध करून परत आले ३३ आणि रामाला वंदन करून भरत हस्त जोडून प्रार्थना करितो—महाराज देश, ग्राम, नगरें, अरण्यें, पर्वत, गुहा इत्यादि सर्व ठिकाणीं शोध केला ३४

यमाद्यदिनजीवेततद्गच्छामिमहापथं ॥ यावद्वैजीव्यतेबालस्तावन्नाश्नामिकिंचन ॥३१
स्वगृहंगच्छभोविप्रबालेनसहभार्यया ॥ माकार्षीर्हिमहद्दुःखंजीवयामिसुतंतव॥ ३२॥
अंकमादायबालंतंजगामस्वगृहंद्विजः ॥ ततस्तेभ्रातरःकालेभरताद्याःसमागताः ॥३३॥
अभिवाद्यविभोःपादौविज्ञाप्यरघुनायकं ॥ भरतउ०॥अरण्येपर्वतेसानौगुहाकंदरगव्हरे ३४
नपश्यामोमहाराजनान्यधर्मंक्कचिद्वयं ॥ सभ्रातृवचनंश्रुत्वावसिष्ठंप्रत्युवाचह ॥३५॥
त्वंगुरुर्ममवंशस्यकस्मात्त्वंमामुपेक्षसे ॥ किंनोदैवंममाद्यंवैद्रष्टासिसकलंजगत् ॥३६॥
अज्ञातंयन्मयानाथतन्मेब्रूहितपोधन ॥ सूर्यवंशप्रदीपस्त्वंमग्नोऽहंसंशयन्हदे ॥ ३७ ॥
कराबलंबनंदेहिउज्जहारकृपानिधे ॥ महादेवउ० ॥ राघवस्यवचःश्रुत्वावसिष्ठोवाक्यमब्रवीत् ॥ ३८ ॥ इतिश्रीपद्मपुराणेसिंदूराद्रिमाहात्म्येद्वादशोध्यायःसमाप्तः ॥ १२ ॥

परंतु कोठेंच अधर्म दृष्टीस पडला नाहीं. असें त्याचें भाषण श्रवण करून राम वसिष्ठाप्रत भाषण करितो ३५ गुरुजी तुह्मी आमचे कुलगुरु असून माझी उपेक्षा कां करितां. आपण अतींद्रिय ज्ञानी आहां. आपण सर्व जगत् पाहतां व आपण आमचें मुख्य दैवत आहां ३६ मला ज्याविषयीं मोह प्राप्त झाला आहे तें तुह्मी कृपा करून सांगा. आपण सूर्यवंशाचे दीपक आहां. मी आज संशयाच्या डोहांत बुडलों आहे ३७ मला आपला हात देऊन वर काढा. महादेव सांगतात हे पार्वति त्याप्रमाणें रामाचें भाषण श्रवण करून वसिष्ठ बोलतात ३८ इति० प० सिं० द्वादशोध्यायः१२

वासिष्ट ह्मणतात हे रामा तूं मला आतां विचारितोस आतांच तर तूं नारदाला विचारलेंस असें बोलून वसिष्ट ध्यानस्थ झाला १ आणि त्या समाधियोगानें हें सर्व जगत् ज्याच्या उदरांत वासकरितें त्या ईश्वराचें स्वरूप सहस्र सूर्यां पेक्षां तेजस्वी असें हृदय कमली सहस्र दलयुत असें आपल्यांत पाहता झाला २ जें अद्वैत रूप, ज्याला क्षण नाहीं, जें शांत स्वरूप, ज्याला कोणताहि उपाधि नाहीं, जें अचल, ज्याच्याच चरणा पासून वाहणाऱ्या भागीरथी प्रमाणें जें स्वच्छ, ज स्फटिकमण्या सारखें निर्मल ३ जें सच्चिदानंदरूप, ज्याला परमात्मा ही संज्ञा आहे, ज्यानें हें संपूर्ण चराचरात्मक त्रैलोक्य व्यापिलें आहे ४ जें

वसिष्टउ ० मांकिंपृच्छसिराजेंद्रपृष्टोयोनारदस्त्वया॥इदमुक्त्वावसिष्ठोऽथध्यानमास्थाययत्नत: ॥१॥ध्यानेनचतदादेविआत्मन्येवंविलोकितं॥हृत्पद्मेकार्णिकामध्येस्फुरद्विद्युत्सहस्रकं ॥ २ ॥ अद्वैतमक्षयंशांतमुपाधिराहितंध्रुवं॥तत्पदांबुनदप्रख्यंशुद्धस्फटिकानिर्मलं॥३॥आनंदघनविज्ञानंपरात्मानंविलोकितं ॥येनसर्वमिदंव्याप्तंत्रैलोक्यंसचराचरं ॥४॥एकोऽनेकस्थितस्त्वाद्यंसूत्रेमणिगणेयथा॥दृष्ट्वातंधूम्रपंतत्रविसृज्य सहसालयं। ५। उन्मील्यचक्षुषीवीक्ष्यराघवंपुरत:स्थितं ॥ आहूयकथितंतस्मैचिंतितंराघवायवै ॥ ६ ॥ वसिष्ठउ ० गच्छशीघ्रंमहाबाहोसिंदूराद्रिंसुनिश्चितं॥विंध्यस्यदाक्षिणेभागेवर्ततेयोजनद्वयं ॥७॥ गिरेर्दक्षिणपार्श्वेतुतिष्ठते नंदिवर्धनं ॥ विंध्यस्यतत्पुरस्यासौस्थितोमध्येतपंगिरि: ॥८॥ सिंदूरस्यवरेशृंगेदक्षिणेयोऽस्तिभैरव:॥भैरवस्यसमीपेवैदक्षिणेविद्यतेनघ॥९ ॥तप

एक रूप असोन अनेक प्रकारचें दिसतें जें अनेक मणि गुंफिलेल्या माळेंतील मुख्यमणी सारखें ह्या जगाचें आदि आश्रयस्थान आहे, तें स्वरूप समाधियोगानें त्याच्या दृष्टिगोचर होतांच त्यांत तो धूम्रपान करून अत्युग्र तप कारणारा शूद्र ही त्यानें पाहिला आणि तत्काल समाधीचें विसर्जन करून ५ नेत्र उघडून पुढें हस्त जोडून नम्र झालेल्या रामचंद्राला संबोधन देऊन वसिष्ठभाषणकरितात ६ हेरामा तूं सत्वर सिंदूरपर्वतावरजा. तो पर्वत विंध्यपर्वताच्या दक्षिणभागीं दोनयोजनांवरआहे॥७ ह्यापर्वताच्या दक्षिणभागीं नंदिवर्धन नामक नगर आहे त्याच्या आणि विंध्याच्या मध्यें तो पर्वत आहे ८॥ त्या सिंदूरपर्व

तावरच दक्षिण भागीं एक भैरवाचें स्थान आहे . त्या भैरवाच्या दक्षिण भागीं ॥ ९ ॥तेथीलभूमीचा पालक कोणी एक शूद्र अ-
त्युग्र तप करीत आहे . त्याच्यापुढें कोणी उभा राहण्यालाही समर्थ नाहीं . ॥ १० ॥ त्यानें पाय वर आणि मस्तक खालीं
करून आपला देह वृक्षाला टांगून घेतला असून मस्तकाच्या खालीं एकमोठें चतुरस्रकुंड अग्नीनें प्रदीप्तकरून ठेविलें
आहे ॥ ११ ॥ तें कुंड एक पुरुष खोल असून त्यांतून एकसारखा धुराचा लोट निघत असतो. त्याच्या नरी आणि नारी
ह्या दोनही भार्या निरंतर त्याची सेवा करीत असतात १२ तो बिल्वपत्रें घेउन कुंडांत हवन करितो .आणि त्याचा धूर नेत्रां

स्तपतिशूद्रोवैतत्रस्थोभूमिपालक: ॥ उग्रादुग्रंतपस्तस्यतत्पुर:कोनसंस्थित: ॥ १० ॥ऊ
र्ध्वपादोह्यध:शीर्षोह्यंतरिक्षेविलंबित: ॥ उत्तमांगादध:कुंडंचतुरस्रंसमेखलं ॥ ११ ॥पुं
स:प्रमाणंगंभीरंधूमज्वालंचवर्तुलं ॥ तस्यपत्न्यौनरीनारीपारिचर्येबभूवतु:॥ १२ ॥स्तू
ह्यबिल्वपत्राणिकुंडमध्येविनिक्षिपेत् ॥ तद्धूमंचक्षुषापानंकरोतिदु:सहंनृणां ॥ १३ ॥
प्रातरारभ्यसंध्यांतंकरोत्येवंनिरंतरं ॥ वर्षाणांद्वादशंजातंउग्रेतपसिसंस्थित:॥ १४॥
गच्छतत्रमहाराजसत्यमेतन्नसंशय: ॥ ज्ञानेनयन्मयादृष्टंतत्त्वंपश्यसुलोचनै:॥ १५ ॥व
सिष्ठवचनंश्रुत्वारामउत्थायचतदाभृशं ॥ गुरुंप्रदक्षिणंकृत्वानमस्कृत्यविसर्जितं ॥१६ ॥शत्रु
घ्नभरताभ्यांचनिवेद्यविषयंपुरं ॥ दुर्गंदुर्गाटवींकोशंगजवाजिपदादिकं ॥ १७ ॥विज्ञाप्य
जननींदृष्ट्वायास्यामिद्विजकारणात् ॥ मामनुज्ञायतामंबपुनरागमनायतु ॥ १८ ॥आ

नीं प्राशन करितो १३ ह्या प्रमाणें प्रातःकालपासुन सायंकालपर्यंत नित्यक्रमचालूआहे ह्याप्रमाणें मनुष्याला करावयास कठी
णअसें अत्युग्र तप करावयास लागुन बारावर्षेंझालीं १४ हें सत्य आहे. तुं त्या स्थानीं जा आणि मी जें ज्ञानानें पाहिलें तें
प्रत्यक्ष पहा १५वसिष्ठाचें भाषण श्रवण करून रामचंद्रउठला आणि वसिष्ठाला नमस्कार व प्रदक्षिणाकरून आपल्या आ
श्रमीं जाण्याला निरोप देऊन १६ भरत आणि शत्रुघ्न ह्या उभयतांस, सर्वदेश, नगर, किल्ले,उपवनें,भांडार, हस्ती, अश्व,
पदाति इत्यादि संपूर्ण राज्याचें संरक्षण करावयास आज्ञाकरून १७ अंतःपुरांत जाऊन मातेला साष्टांग वंदन करून, मी

ब्रह्मणाच्या कार्यार्थ सिंदुरपर्वतावर जात आहें मला आज्ञा दे १८ मी थोड्याच कालानें प तयेईन अशी प्रार्थना करिता झाला. हें ऐकून कौसल्या भाषणा करते १९ नरव्याघ्रा रामा, शत्रूला जिंकून सत्वर परतये अशी मातेची अनुज्ञा मिळतांच राम भरताला सांगतात–भरता २० पुष्पक विमान पूजा करून सत्वर आण. तत्काल भरतानें विमान आणिलें २१ आणि याची गंध, पुष्प, धूप, दीप इत्यादि उपचारांनीं यथाविधि पूजा केली नंतर त्या इच्छागामि विमानांत २२ सीता, लक्ष्मण ह्यांसह वर्तमान रामचंद्र आरोहण करिता झाला आणि हनुमंतास पुढें बसविलें २३ अक्षय बाणभाते, धनुष्य,

गच्छामिनसंदेहस्त्वपादांतिकंप्रति ॥ राघवस्यवचःश्रुत्वाकौसल्यावाक्यमब्रवीत् ॥ १९ ॥
शीघ्रमेहिनरव्याघ्रजित्वारिंममसन्निधिं ॥ लब्ध्वानुज्ञांततोरामोभरतंप्रत्युवाचसः ॥ २०॥
विमानंपुष्पकंवीरआनयस्वसमर्चितं ॥ तच्छ्रुत्वाभरतस्तुर्णंसमानीयसमीपतः ॥२१॥ गं
धपुष्पादिनैवेद्यैरर्चयित्वायथाविधि ॥ समासीनंविमानंतंकामदंकामरूपिणं ॥२२॥आ
रुरोहनृपस्तत्रसीतयासहभार्यया ॥ हनुमंतंपुरःस्थाप्यलक्ष्मणेनसहायवान् ॥२३॥ तू
णीरावक्षयौगृण्हन्सधनुःखड्गमुद्गरौ ॥ मनसाचिंतितंस्थानंविमानेनाभ्ययात्क्षणात्॥२४॥
ददृशुस्तेमहास्थानंकामदंसर्वदेहिनां ॥देवानांदानवानांचमर्त्यानांपापनाशनं ॥ २५ ॥
आनंददायकंरम्यंसर्वानंदमयंगिरिं ॥ तेनिरस्तश्रमाजातासंप्राप्ताश्वतपंगिरिं ॥ २६ ॥
मृगचाषभरद्वाजकपोताःकाकपिंगलाः ॥ यांतिप्रदक्षिणंतस्यतथान्येशकुनावराः॥ २७॥

खड्ग, मुग्दरही आयुधें घेऊन क्षणमात्रानें इच्छिलेल्या स्थानीं प्राप्त झाला २४ आणि अतिशय उच्च, मनुष्यांचे मनोरथ पूर्ण करणारा देव, दानव, मनुष्य, ह्यांच्या पातकाचा नाश करणारा २५ आनंद देणारा, अतिरम्य सर्व आनंदाची केवल मूर्तीच अशा त्या सिंदूर पर्वताला पाहतां समाधान पावला व तपंगिरीला पाहून त्यांचे श्रम हरून गेले २६ त्या पर्वता-भोंवतीं मृग, चाष, भरद्वाज, कपोत, काक, पिंगळ तसेच अनेक इतर पक्षी फिरत होते २७

एक योजन त्याची उंची, अनेक गुहांनीं व शिखरांनीं जो भयंकर, सिंहांचे कळप, मोठमोठे भयंकर भुजंग, व्याघ्र,वनगज २८ आस्वल, वानर ह्यांचे समूह, तसेंच जंबूक, भालु, मयंकर दंष्ट्रेचे रानडुकर जणूं काय शुंडारहित हस्तीच २९ लहान लहान मृगांचे छावे, शार्दूल, शरभ, आरण्य महिष, वनगाई, ऋषींच्या होमधेनू, ३० भयंकर भुजंग, रुरुमृग, इत्यादि अनेक प्रकारचे पशुपक्षी त्या पर्वतावर वास करीत होते ३१ तसेंच उलुक, गृध्र, सारस, कोकिळ ह्या पक्षांनीं तो सुशोभित दिसत होता व मयुरांचें तेथें नृत्य होत होतें, पारावत व राघू त्यावर मधूर शब्द करीत होते ॥ ३२ ॥

योजनायतमुच्छ्रायंकपाटैर्विषमोगिरि: ॥ सिंहयूथैर्महानागैर्महाव्याघ्रैर्महागजैः ॥ २८ ॥ ऋक्षैर्वानरयूथैश्चभल्लकैर्जंबुकैर्युत: ॥ वक्रदंष्ट्रैर्वराहैश्चकरहीनैर्यथाद्विपै: ॥ २९ ॥ मृगशावैश्चशार्दूलै:शरभैश्चपलम्महै: ॥ अरण्यमहिषैर्मत्यैर्गोभिश्चमुनिधेनुभि:॥ ३० ॥ आशीविषैर्महासर्पैरुरुभि:शशभिर्बहु ॥ श्वापदैर्बहुभिस्तत्रज्वालावक्रमहाशिखै:॥ ३१ ॥ उलूकै:स्वरवैर्गृध्रै:सारसै:पुरकोकिलै: ॥ मयूरनर्तनैरम्यंपारावशुककूजितैः ॥ ३२ ॥ अनेकपक्षिभिर्युक्तंमुक्तंनैवास्तिकुत्रचित् ॥ ध्यानयुक्तैर्महासिद्धैर्दृष्टुस्तंतपंगिरि ॥ ३३ ॥ऋषिसंघै:समाकीर्णनानाश्रमसमाकुल ॥ वेदाध्ययनसंयुक्तैरग्निहोत्रपरायणै: ॥ ३४ ॥ तपस्तपंतिसर्वेपियथायेनाधिनिष्टितं ॥ एकपादेस्थिताःकेचित्केचिदादित्यसन्मुखा: ॥३५॥ वायुभक्षास्तथाकेचित्केचिन्मासोपवासिनः॥शुष्कपर्णाशिना:केचित्केचिन्मूलफलाशन: ३६

असा अनेक पशुपक्षी गणानें युक्त, तो पर्वत सर्वत्र गजबजलेला होता. आणि सिद्ध संघ त्यावर ध्यानस्त बसले होते. असा तो तपंगिरि त्यांनीं पाहिला. ३३ तो ऋषिसंघानें युक्त, होता त्यावर अनेक प्रकारचे ऋषींचे आश्रम होते. आणि तेथें ऋषिजन वेदाध्ययन आणि अग्निहोत्र होम करीत होते ३४ आपापल्या इच्छेप्रमाणें सर्व ऋषी त्यावर तप करीत होते, कित्येक एका पायावर उभे राहिले होते, कितीएक एकसारखी सूर्याकडे दृष्टी लावून उभे होते ३५ कोणी केवल वायु भक्षणच करून, कित्येकमासोपवास करून, कोणी वृक्षांचीं वाळलेलीं पानेंच भक्षून, 'कित्येक फळमुळें भक्षून ३६

किल्येक शाकाहारच करून, कोणी केवल तक्रच प्राशन करून, कोणी वृक्षांच्या सालीच भक्षून, कोणी केवल दुग्धच प्राशन करून ३७ किल्येक पुष्पांतील मधूच सेवून, पांच पांच दिवस केवळ येवढ्याच भक्ष्यावर राहत होते. किल्येक एक रात्रोपोषण करीत होते किल्येक धारणापारणा व्रत करीत होते ३८ पाहतो तों कोणी चांद्रायणें कारितात कोणी इतर व्रतें आचरितात, कोणी प्रणवाचाच जप कारितात, किल्येक रुद्र जप कारितात ३९ किल्येक पवमान सूक्ताचा जप करीत आहेत, कोणी चंडीपाठ करीत आहेत, किल्येक मृत्युंजय महामंत्राचा जप करित आहेत ४० किल्येक पापापासून भय

शाकाहाररताश्चान्येकेचित्तक्राशना:परे ॥ त्वङ्मात्रभक्षणाश्चान्येपयोहारास्तथापरे ॥३७॥
पुष्पमधुरता:केचित्पंचरात्रमत:परे ॥ एकरात्रोपवासाश्च अन्येरुद्ररताद्विजा: ॥ ३८ ॥
चाद्रायणपरा:केचिदन्येव्रतपरायणाः ॥ प्रणवेचरता:केचित्केचिद्रुद्रपराद्विजाः ॥ ३९ ॥
पावमानजपा:केचित्केचिच्छक्तिजपेस्थिताः ॥ मृत्युंजयजपा:केचिदघोरजापका:परे ॥४०॥
गायत्रींरुद्रगायत्रींपापभीताजपंतिते ॥ अनेकानेकशोवीक्ष्यराघवोविस्मितोऽभवत् ॥४१॥
बभाषेलक्ष्मणंसोथक्वचिद्दृष्टास्त्वचयानघ॥ एवंगुणैःसमायुक्तोगिरीरम्य:सुमित्रज ॥४२॥
चित्रकूटादिलंकांतंभ्रांतंतुबहुविस्तरं ॥ नश्रुतंनमयादृष्टंइष्टंसर्वजनेऽस्यवै ॥ ४३ ॥ अ
द्वेष्यमद्वयंरम्यंपवित्रंपापनाशनं ॥ उपाधिभेदरहिताःसर्वेशांतिपरायणा: ॥ ४४ ॥ पर
स्पराविरोधेनएकत्रसमधिष्ठिता: ॥ कस्माद्राज्यंकुत:सौख्यंयावदेतन्नदृश्यते ॥ ४५ ॥

पावलेले गायत्री आणि रुद्र गायत्री ह्यांचा जप करित आहेत. अशा आश्चर्यांनीं युक्त अशा त्या पर्वताला पाहतांच रामचंद्र विस्मित होऊन ४१ लक्ष्मणाप्रत भाषण करिता झाला—लक्ष्मणा अशा प्रकारचा अत्यंत रमणीय पर्वत आज पर्यंत तूं कोठे पाहिलास काय ? ४२ चित्रकूट पर्वतापासून लंकेपर्यंत आपण पुष्कळ फिरलों परंतु असें रम्यस्थल मी कोठेंच पाहिले नाहीं ४३ ज्या ठिकाणीं द्वेश- नाहीं, जें अत्यंत रमणीय, पापनाशक, ज्या ठिकाणीं क्रूर पशुपक्षीही भेदबुद्धि सोडून शांत स्वभावानें वागत आहेत ४४ जेथें परस्पर द्वेशबुद्धि सोडून जन्मींचे द्वेषी प्रेमभावानें एकत्र वास करितात.

असें हें स्थान पाहिल्यानंतर राज्य सुखकारक असें कोणाला वाटेल? ४५ ह्या पर्वताच्या दर्शनानें ज्याला आनंद होणार नाहीं व ज्यास हा पूज्य मानणार नाहीं अशाहून अधिक मूढ बुद्धि कोणीच नाहीं. शंकर सांगतात, हे गिरिजे असें बोलून पर्वताला प्रदक्षिणा करून ४६ रामचंद्र त्या भैरवाच्या समीप प्राप्त झाले. आणि भैरवाला प्रदक्षिणा नमस्कार करून आपण गुप्त राहून ४७ तो शूद्र गुप्तरूपानें कोठें तप करित आहे तें पाहून ये, अशी मारुतीला आज्ञा करिता झाला. अशी रामचंद्राची आज्ञा होतांच महाबल तो वायुपुत्र ४८ उड्डान करून वृक्षाच्या शाखेवर जाऊन बसला आणि जेथें प्रवेश करणें मोठ्या पराक्रमी पुरुषालाही कठीण अशा त्या दुर्गमस्थानीं जाण्याविषयीं यत्न करूं लागला ४९

दृष्ट्वैवनानुमोदेततत्परंकोऽपिमूढधीः॥ एवमुक्त्वावरारोहेसव्यंकृत्वातपंगिरिं ॥४६॥
प्राप्तस्तत्रमहाभागोयत्रास्तेगुप्तभैरवः ॥ तंनत्वादक्षिणेकृत्वागुप्तांकृत्वात नूंततः ॥ ४७ ॥
प्रेषितस्तत्रवीरोऽसौपश्यशूद्रंतपःस्थितं ॥प्रस्थापितस्ततोवीरोवायुपुत्रोमहाबलः॥ ४८ ॥
उत्पत्यचततःशाखामारुह्यकपिकुंजरः ॥ तंदूर्ध्वंगंतुमारब्धोवल्लीत्रिर्विषमंमहत् ॥ ४९ ॥
अगम्यंपक्षिजातीनांगगनेपततांध्रुवं ॥ वायुपुत्रोगतःशीघ्रंदृष्ट्वातंतपसिस्थितं ॥ ५० ॥
ऊर्ध्वपादमधःशीर्षंपिबंतंधूम्रमक्षिभिः ॥ तंदृष्ट्वासंनिवर्त्याथगत्वारामसमीपतः ॥ ५१ ॥
वसिष्ठेनयथाप्रोक्तंतत्तथोवाचवैविभो ॥ अक्षिभ्यांपिबतेधूम्रंमूर्ध्निपादावधःशिरः ॥ ५२ ॥
इतिश्री प०पु०त्रयोदशोध्ययः समाप्तः ॥ ७ ॥ ७ ७ ७ ७॥

आणि ज्या स्थानीं पक्षांचीही गति नाहीं अशा त्या दुर्गम स्थानीं आनायासानें क्षणमात्रांत जाऊन त्या तप करणाऱ्या शूद्राला पाहता झाला ५० त्यानें आपले पाय वृक्षाला टांगून घेतले आहेत, मस्तक खालीं लोंबत आहे, धूम्र प्राशन करीत आहे, अशा त्या तापस शूद्राला पाहून मारुती पुनः रामचंद्राच्या समीप प्राप्त झाला ५१ आणि महाराज वसिष्ट ऋषीनें जें सांगितलें तें सर्वस्वीं खरें आहे, तो शूद्र खरोखरच खालीं मस्तक करून धूम्रपान करीत आहे असें रामचंद्राला सांगता झाला ५२ इति प० सिं० त्रयोदशोध्यायः १३ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

शंकर सांगतात, हे पार्वति हें मारुतीचें भाषण श्रवण करून रामचंद्र वर उठून, सीतेसह तूं या ठिकाणीं राहा, अशी लक्ष्मणाला आज्ञा करून मारुतीप्रत भाषण करितात १ मारुते त्या दुर्गमस्थानीं कोणत्या उपायानें जावें तें सांग? हें रामाचें भाषण ऐकून मारुती सांगतो २ महाराज माझ्या स्कंधावर बसा. मी तुह्माला त्याच्या समीप पोंचवितों. तत्काल ह्मातांत खड्ग घेऊन राम त्याच्या स्कंधावर बसले ३ आणि क्षणमात्रानें त्या ठिकाणीं प्राप्त होतांच खालीं उतरले आणि तप करणाऱ्या त्या शूद्राला पाहून बोलतात ४ अरे वर्णभ्रष्टा महापातक्या! आतां आपलें तप पुरें कर. ही रा-

ईश्वरउ०हनुमद्वचनंश्रुत्वाउत्थायरघुनंदन: ॥ उवाचलक्ष्मणंतत्रतिष्ठत्वंसहसीतया॥१ ॥
केनोपायेनगंतव्यंहनुमन्वदनिश्चितं ॥ राघवस्यवच:श्रुत्वाहनुमान्वाक्यमब्रवीत् ॥ २ ॥
आरोहयममस्कंधंतस्यनेष्यामिसंन्निधिं ॥ खड्गमादायचारुह्यस्कंधांशेचनृपोत्तम ॥ ३ ॥त
त्रप्राप्तोमहाबाहुरुत्तीर्यभुविसंस्थित: ॥ दृष्ट्वातपंतंतंशूद्रंवाक्यमूचेरघूत्तम: ॥ ४ ॥वर्ण
भ्रष्टमहापापतप:संहरसंहर ॥ तांश्रुत्वानिष्ठुरांवाणींआत्मानंमोक्षितुंबलात् ॥५ ॥ लो
हदंडंसमादायतिष्ठतिष्ठेतिचाब्रवीत् ॥ सरोषोधावमानोऽसौआगत:संमुखस्तदा ॥ ६ ॥पु
रुषंतंवदन्नेवंअन्यशक्त्याहत:कपि: ॥ इदानींरक्षयात्मानंइदमुक्त्वानराधिप ॥ ७ ॥
आगतोधावमानोऽसौभ्राम्यमाण:समुद्गरं॥ततोमहासिनाकायाच्छिरश्छित्वानिपातित:।८।
शूद्रेणपूर्ववृत्तांतंस्मृतंचसुरनंदिनि ॥ शिरसात्रुटितेनाहरामरामेतिराघव ॥ ९ ॥ ॥

माची निष्ठूर वाणी श्रवण करून त्यापासून आपलें रक्षण करावयासाठीं ५ हस्तांत लोहदंड घेऊन उभा राहा, उभा राहा असें मोठ्यानें ओरडत अतिशय क्रोधानें रामचंद्राच्या समोर धांवत आला ६ आणि त्या लोहदंडानें मारुतीवर अघात करिता झाला ७ आणि रामचंद्राच्या आंगावर आतां सांभाळ असें ह्मणून धांवून आला, तत्काल रामानें खड्गानें मस्तक तोडून त्याला भूमीवर पाडिला ८ तेव्हां त्या शूद्राला पूर्वीचें सर्व स्मरण झालें आणि त्याचें तें तुटलेलें मस्तकच 'राम राम' असें ह्मणून रामाप्रत बोलूं लागलें ९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

हे रघुत्तमा, मी तुला शरण आलों आहे. माझें रक्षण कर. मी तुला जीं कठोर भाषण बोललों तो माझा मूर्खपणा आहे १० हे रावणांतका! हे कुंभकर्ण भुज छेदका! मला क्षमा कर ११ रावणाचा वंशरूपवृक्ष ज्या तूं बिभीषण व्यतिरिक्त सर्व पल्लव व शाखांसह जाळून टाकिलास १२ हे सीतापते, हे रघुनायका, विश्वामित्रा नंददायका, हे ताटकांतका मला क्षमा कर १३ आपल्या पादधुलीच्या स्पर्शानें अहल्येला शापापासून मुक्त करणाऱ्या हे विश्वामित्रा भयदायका,

शरण्योऽस्मिशरण्योऽस्मिरामरामरघूत्तम ॥ परुषंयन्मयाचोक्तंअज्ञानेनजगत्पते॥ १०॥
क्षमस्वभोमहाकालकालरावणसूदन ॥ कुंभकर्णभुजादंडखंडखंडितलांछनं ॥ ११ ॥
रावणपादपोन्मूल्यंसशाखपल्लवस्त्वया ॥ दग्धेभस्मीकृतोनूनंत्यक्त्वामूलीबिभीषणं॥ १२॥
क्षमस्वमैथिलीकांतक्षमस्वरघुनायक ॥ क्षमस्वकौशिकानंदक्षमस्वताटकांतक ॥ १३ ॥
क्षमस्वपादसंपर्केवाहल्याशापमोचक ॥ विश्वामित्राभयंदत्वाक्षमस्वयज्ञरक्षक ॥ १४ ॥
त्र्यैंबकंधनुर्भक्त्वात्वयारामद्विधाकृत ॥ माक्षिप्तंस्वर्गपातालंसीतालब्धापराक्रमात् ॥ १५॥
कोदंडभग्नत: शद्बं श्रुत्वाग्रधावमानकरपरशुभ्राम्यमाणप्रलयानलवत् लीलाजितपरशु राम क्षमस्व श्रीरामचंद्र स्वगृहान्निर्गतो नृपो दशरथ:॥ १६॥दुर्गादुर्गाटवीसमस्तदेशकोश भांडार गोरथवाजिदंतिपादात्यमात्यप्रधानपुरोहितछत्रवस्त्रचातुर्वर्णालंकृतायोध्यांत्यक्त्वा

हे यज्ञ रक्षका १४ तूं जनकाच्या स्वयंवर मंडपांत जाऊन शिवाचें तें प्रचंड धनुष्य भग्न केलेंस व लीलेनें फेंकून देऊन पराक्रमानें सीतेला वरिलेंस त्या शद्बानें स्वर्ग, मृत्यु, पाताल हे तीनही लोक दणाणून गेले १५ तो शद्ब श्रवण करून परशुराम प्रलयकालच्या अग्नीसारखा क्रुद्ध होऊन परशु उगारून धावून आला त्या परशुरामाला सहज लीलेनेंच तूं जिंकिलास १६ नंतर दशरथ राजा तुझ्या विवाहार्थ अमात्य पुरोहित सर्व सेना ह्यांसह त्या ठिकाणीं प्राप्त झाला

आणि यथासांग विवाह करून आपल्या नगरीं जाऊन सर्व राज्य तुझ्या स्वाधीन करिता झाला. पित्याची आज्ञा पालन कर ण्याकरितां त्या राज्याचा तृणवत् त्याग करून जानकी आणि लक्ष्मण ह्यांसह वर्तमान वनवास करिता झालास १७ त्या ठिकाणीं इंद्र काकरूप घेऊन येऊन सीतेला पिडा करूं लागला, त्याचा गवताच्या काडीनें नेत्र फोडून त्याला काणा करिता झालास १८ नंतर अक्षय बाणभाते आणि राक्षसांचा नाश करणारे धनुष्य ऋषीं पासून संपादन करून पुढें गेलास १९ तेथें शूर्पनखेची नासिका छेदून तिला विरूप करून तिला रावणाकडे पाठविलीस २० आपल्या भगिनीला वि-

तृणवत्पट्टाभिषेकसमयेऽपितृराज्ञयापुरंत्यक्त्वावनवासंपुरस्कृत्य जानकीलक्ष्मणसहितो गतोसि जानकीशक्षमस्वामांश्रीरामचंद्र ॥ १७ ॥ आगतःकाकरुपेणपापात्माकृतपापाधीः ॥ हत्वानेत्रेतृणाग्रेणकृतःकाणःक्षमस्वमा ॥ १८ ॥ तूणीरावक्षयौलब्ध्वाचापंनकचरापहं ॥ ऋषीणामभयंदत्वाजगामाधक्षमस्वमां ॥ १९ ॥ राक्षसीनासिकांछित्वाविपरीताविडंबिता ॥ गतासारावणोपांतेसीतारामक्षमस्वमां ॥ २० ॥ दृष्ट्वाशूर्पणखांवीरैरावणाद्यैर्विडंबिता ॥ सामाभिसंन्निधिंप्राप्ताआश्वस्तासाक्षमस्वमां ॥ २१ ॥ ततोद्वंद्वमभूद्रुद्धंजटायुरावणाख्ययोः ॥ स्वकरेणचयोदग्धकृत्वामोक्षंक्षमस्वमां ॥ २२ ॥ अनेनवायुपुत्रेणपंपातीरेस्वदर्शनं ॥ कृत्वाराक्षसःसुप्रीतोपुष्पमूलेक्षमस्वमां ॥ २३ ॥ संदर्शनंकृतंतेनसुग्रीवेणत्वयासह ॥ सर्वनिवेंधचात्मीयंवालिनायत्कृतंमम ॥ २४ ॥

रूप केली असें पाहतांच रावणादिवीर अतिशय क्रुद्ध झाले आणि तिचें सांत्वन करून रावण सीतेचें हरण करण्यासाठीं प्राप्त झाला २१ तो सीतेला घेऊन जात असतां वाटेंत जटायूचें आणि त्याचें युद्ध होऊन त्यांत जटायु मरण पावला, त्याला आपल्या हस्तानें दग्ध करून मोक्ष देता झालास २२ नंतर पंपासरोवरावर ह्या मारुतीची भेट झाली ह्या पासून तूं आनंद पावलास २३ पुढें मारुतीनें सुग्रीवाशीं तुझें सख्य केल्यानंतर सुग्रीवानें वालीनें केलेलें सर्व कर्म तुला निवेदन केलें २४ सुग्रीवाला प्रत्यय येण्याकरितां त्या ऋष्यमूक पर्वतावर वालीनें टाकिलेलें, दुंदुभि दैत्याचें कलेवर तू

आपल्या पादांगुष्ठानें दूर उडविता झालास २५ नतर एकाच बाणानें सात तालवृक्ष तोडिलेस आणि वालीचा वध करून सुग्रीवाला राज्यपदावर स्थापिता झालास २६ नंतर सर्व वानर सेनेसहित त्या सुग्रीवाला बरोबर घेऊन समुद्रतीरीं गेलास, परंतु समुद्रानें अयोध्यावासी जो तू तुझा सन्मान केला नाहीं २७ तत्काल तूं क्रुद्ध होऊन त्यावर जाज्वल्य अग्नी सारखा प्रदीप्त बाण टाकिलास हें पाहून समुद्र तुला शरण आला आणि सेतु बांधून लंकेंत जाण्याचा उपाय सांगता झाला २८ सीतेच्या शोधार्थ वानर पाठविले संपातीला मार्गे ठेविलें आणि मारुती लंकेंत जाऊन सीतेचा शोध घेऊन

वालिनातत्रनिक्षिप्तंदुंदुभेस्तुकलेवरं ॥ पादांगुष्ठानभागेनदूरेक्षिप्तंक्षमस्वमां ॥ २५ ॥
सप्ततालांस्ततश्छित्वाशरणैकेनलीलया ॥ यौवराज्येप्रतिष्ठाप्यसुग्रीवंहेमपिंगलं ॥२६॥
तेनसार्धंततोगत्वासिंधुतीरंक्षमस्वमां ॥ अयोध्यावासिनेतुभ्यंनमेनेसरितांपतिः ॥ २७॥
कोपेनतुत्वयाक्षिप्तःसमुद्रेऽग्निशरःक्षमः ॥ उपायःकथितस्तेनसेतुंकर्तुंक्षमस्वमां ॥ २८॥
आज्ञप्तायूथपाःपूर्वंसंपातिश्चापिप्रेषितः ॥ हनुमानागतोलंकांदृष्ट्वासीतांक्षमस्वमां॥२९
योद्धुकामाःप्लवंगास्तेउत्तीर्यसहसागरे ॥ त्वयाज्ञप्तोंगदोवीरोरावणाग्रेसुनीतिवान् ॥ ३० ॥
नमेनेतंदशग्रीवोयुद्धायकृतनिश्चयः ॥ युद्धायाथगतादेवसुग्रीवादिकपीश्वराः ॥ ३१ ॥
वानराश्चित्रकूटांतादागत्यसरितांपतिं ॥ उत्तितीर्षुस्ततोलंकांदग्धांहनुमतातदा ॥ ३२ ॥
लक्ष्मणेनतवभ्राताहतःशत्रुर्जितोध्रुवं ॥ जितारिःसर्वदाधीरोगंभीरोमंत्रवित्क्षमः ॥ ३३ ॥

आला २९ नंतर युद्धार्थ सुवेळेवर सर्व वानर सैन्य प्राप्त होतांच अंगदाला साम करण्याकरितां तूं नीती स्मरून रावणाकडे पाठविता झालास ३० तें रावणाला न रुचल्यामुळें सर्व वानरसैन्यासहित रावणाशीं भयंकर युद्ध प्रवृत्त झालें ३१ त्या युद्धांत सर्व पृथ्वीवरील वानर आले होते. लंका तर मारुतानें पूर्वीच जाळून टाकिली होती ३२ नंतर लक्ष्मणानें इंद्रजिताला मारिलें, तो मोठा पराक्रमी होता व त्यानें सर्व देवांस जिंकिलें होतें ३३ नंतर देवानांही दुर्जय अशा त्या कुंभ

कर्णाला युद्धांत मारून ३४ पांच अर्बुद वानरांसह वर्तमान रणांगणांत युद्ध करणाऱ्या महापराक्रमी अशा त्या रावणाला रणभूमीवर पाडिता झालास. असा जो पराक्रमी तू रामचंद्र तो तूं मला क्षमा कर ३५ हें त्याचें भाषण श्रवण करून रामचंद्र ह्मणतात—हे शूद्रा आतां फार कशाला बोलतोस पुरें कर, जर तुला जीवित पाहिजे असेल तर तुला मी जीवदान देतों परंतु आपलें तप सोडन दे ३६ शूद्र ह्मणतो हे रामचंद्रा जें देव, दैत्य, मनुष्य, सिद्ध, गंधर्व, राक्षस, ज-

अजितोदेवदुर्धर्षोदु:सहोदेवदुर्जय: ॥ कुंभकर्णेहतेयुद्धेराक्षसैर्बहुभि:सह ॥ ३४ ॥
पंचाशदर्बुदै:सार्द्धयुध्यमानोमहारणे ॥ त्वयानिपातितोभूमौदशग्रीव:क्षमस्वमां ॥ ३५ ॥
श्रीरामउवा०॥ अलंवचोभि:शूद्रत्वमिछसेजीवितुंयदि ॥ ददामितेनसंदेहोजीवितंत
पसाविना ॥ ३६ ॥ शू०उ० ॥ देवासूरमनुष्याणांसिद्धगंधर्वरक्षसां ॥ स्वेदजोद्भिदज
श्चैवअंडजोजारजादिषु ॥ ३७ ॥ योगीनांसमंदष्टिनांअन्येषांयत्सुदुर्लभं ॥ तत्प्राप्तंभो
जगन्नाथत्वांतेदृष्टोऽसिराघव ॥ ३८ ॥ नविभातिसुरत्वंचमुनित्वंनाविभातिवै ॥ इत्थंप्राप्तं
मयाराजन्जीवितंकिंततोऽधिकं ॥ ३९ ॥ अनुज्ञांदेहिमेदेवयास्यामिपरमंपदं॥श्रीरामउ०
यदिकश्चिद्वरोमत्तोयाचयिष्यसिसुव्रत ॥ ४० ॥तद्ब्रूहिमेददाम्यद्यअदेयंनास्तिमेध्रुवं ॥
धूम्रपउ० ॥ अहंयास्यामिकैवल्यंवरंकस्मै छ छ छ छ छ छ

रायुज, स्वेदज, अंडज, उभ्दिज्ज, ३७ समदृष्टियोगी तसेच इतर कोणतेही प्राणी ह्यांस दुर्लभ, तें तुझें दर्शन मला प्राप्त झालें ३८ जें देवानां किंवा ऋषींनांही प्राप्त होत नाहीं तें तुझें दर्शन जर मला प्राप्त झालें तर तें पाहून आलें आतां जगण्यांत अर्थ काय आहे? ३९ आतां मला आज्ञा दे मी परमपदाप्रत जातों. राम ह्मणतात जर तुला माझ्यापाशीं कांहीं वर मागावयाचा असेल तर माग ४० ॥ ॥ ॥ ॥ ॥

मी देण्याला सिद्ध आहे, ह्या वेळीं मला अदेय असें कांहीं नाहीं. हें ऐकून तो शूद्र ह्मणतो ४१ मीं आतां ज्या स्थानीं गेलों असतां पुनरावृत्ति नाहीं अशा मोक्ष स्थानीं जात आहें आणि तूं वर कोणाला देतोस. राम ह्मणतात असें आहे तथापि तूं कांहीं तरी वर माग ४२ मग तो आत्मार्थ असो किंवा परमार्थ असो. तो धूम्रपान करणारा शूद्र ह्मणतो, महाराज आपली आज्ञा शिरसा वंदन करितों ४३ मी आपल्याला अभीष्ट असे तीन वर तुझ्यापाशीं मागतों. राम ह्मणतात लोक कल्याणार्थ हे तीन वर मी तुला देतों ४४ जे आजपर्यंत कोणालाच दिले नाहींत असेही वर देतों. शूद्र ह्म-

प्रयच्छसि ॥ ४१ ॥यद्गत्वाननिवर्ततेपरंब्रह्मसनातनं ॥ श्रीरामउ० ॥ तथापित्वंवरंब्रूहिस र्वभावेननान्यथा ॥ ४२ ॥यथातेरोचतेवीरपरार्थेचात्मनःप्रियं ॥धू०उ० ॥गृण्हामिशिर सानाथआज्ञांतेराघवप्रभो ॥ ४३ ॥वरत्रयमुदारंमेवरंयन्मनसेप्सितं ॥ श्री०उ०॥वरमेत त्प्रदास्यामिजनख्यातिंत्वयात्मनः ॥ ४४ ॥संस्थितोगुप्तएतावदधुनालोकविस्तरं ॥ शू०उ० नकदाचित्त्वयादेवत्यक्त्वायंसिंधुराचलं ॥ ४५ ॥प्रलयेपिनगंतव्यंगिरेरन्यत्रसुव्रत॥ देवका र्येनगंतव्यंनतुसंत्यज्यपर्वतं ॥ ४६ ॥ त्यक्त्वाचैतंनगंतव्यंकलौप्राप्तौविदूरतः ॥ अधिदे वाधिभूताश्चतापाह्याध्यात्मिकास्तथा ॥ ४७॥ कलौप्राप्तेविवर्द्धंतेतस्मादत्रस्थिरोभव॥ प्रभवंतिनतेसर्वेयत्रत्वंहिस्वयंस्थितः ॥ ४८ ॥ सानुगैर्ब्राह्मणैःसार्द्धंमोक्षेणाभिनुतःप्रभो ॥ याचितोयंवरेदेवदेहित्वंप्रथमोमम ॥ ४९ ॥ श्रीरामउ० ॥ ब्राह्मणस्यचपुत्रार्थेप्रातिज्ञा

णता—तूं ह्या सिंदूर पर्वताला सोडून ४५ प्रलयकालींही अन्यत्र जाऊं नये. मध्यें कांहीं देवकार्य प्राप्त झालें तथापि पर्वत सोडूं नये ४६ निरंतर ह्या पर्वतावरच वास करावा. कलींतही येथेंच राहावें अधिदैविक, अधिभौतिक आणि आध्यात्मिक हे त्रिविध ताप ४७ कलियुगांत वृद्धिंगत होणार ह्मणून तूं ह्या पर्वतावर स्थिर रहा. तूं ज्या ठिकाणीं राहशील त्या ठिकाणीं ते पीडा करणार नाहींत ४८ आपल्या अनुचरांसह व ब्राह्मणांसह भक्तांनां मोक्ष देण्यासाठीं माझ्या प्रार्थनेवरून तूं ह्या पर्वतावर नित्य वास करावा हाच माझा पहिला वर ४९ राम ह्मणतात—ब्राह्मणाच्या पुत्राकरितां जी मी

प्रतिज्ञा केली आहे कीं त्याला जिवंत केल्याशिवाय अन्न सेवन करणार नाहीं. ती प्रतिज्ञा सिद्धीला नेऊन ५० ब्राह्मण पुत्राला पुनः सजीव पाहून दहा दिवसांचे आंत पुनः ह्या ठिकाणीं येऊन हा पर्वत जसा अचल आहे तसा अचल होऊन राहतों ५१ पुनः दुसरा वर तुला अभीष्ट असेल तो माग. तो ह्मणतो—देवा! तुझ्या प्रसादानें माझा हा देह ५२ लिंगरूप होवो आणि तुझ्या हस्तस्पर्शनानें सर्व जगताला तें लिंग पूज्य होवो. अशा त्याच्या प्रार्थनेवरून रामचंद्र त्याच्या देहाला स्पर्श करिता झाला ५३ तत्काल त्याचें धडही मेखला आणि शिर हें लिंग असें होऊन तें शिवलिंग त्रिभुवनांत

**यामयाकृता ॥ जीवंतंबालकंदृष्ट्वाकरिष्येपारणंततः ॥५० ॥ पुनरागमनंमेत्रदशाहाभ्यंतरेकिल ॥ त्यक्त्वायोध्यांप्रतिष्ठामिअचलोयंयथागिरिः ॥ ५१ ॥पुनर्ब्रूहिवरंचान्यद्वितीयंचात्मनःप्रियं ॥ धूम्रपउ० ॥ त्वत्प्रसादाज्जगंनाथममेदंहिकलेवरं ॥ ५२ ॥लिंगंभवतुपूज्यंस्पर्शात्तवकरस्यच ॥ शूद्रस्यवचनाद्रामःस्पृष्ट्वातंधूम्रपंशिवं ॥ ५३ ॥स्पर्शेनैवतदादेहोमेखलाचभवत्तदा ॥ शिरोलिंगंमहज्जातंविख्यातंभुवनत्रये ॥ ५४ ॥शिलोपरिचतंलिंगंनिधायरघुराट्स्वयं ॥ ऊचेलींगंततोवाक्यंश्रूयतांरघुनायक ॥ ५५ ॥दातुंशक्नोम्यहंनाथअणिमाद्यार्थशक्तयः ॥ त्वत्प्रसादाद्वरोलब्धोद्वितीयोयंरघूत्तम ॥ ५६ ॥श्रीरा०उ० ॥यंयंकामयतेत्वत्तःसाधकास्तेमहाशिव ॥ तत्तथासत्यमेवाक्यंनान्यथाप्रलयेगते ॥ ५७ ॥धूम्र ॥ उ० ॥तिष्ठसेभोजगंनाथसिंदूरेनिश्चलोयदा ॥ तदालोकस्ययात्रावैभविष्यतिदिनेदिने ॥५८॥**

पूज्य झालें ५४ रामचंद्रानें तें लिंग एका मोठ्या शिलेवर स्वतः उचलून ठेवितांच तें पुनः रामाप्रत बोलूं लागलें ५५ जे माझें आराधन करितील त्यांस अणिमादि अष्टौ सिद्धिही देण्याचें तुझ्या प्रसादानें माझ्या आंगीं सामर्थ्य असावें. हा माझा दुसरा वर होय ५६ राम ह्मणतात हे शिवा तुझे भक्त जे जे तुझ्या पासून वर इच्छितील ते ते त्यास पूर्ण प्राप्त होतील, हें माझें सत्य भाषण जाण, हें प्रलयकालींही असत्य होणार नाहीं ५७ पुनः तो लिंग झालेला धूम्रपान करणारा शूद्र रामचंद्राप्रत भाषण करितो—देवा तूं ह्या सिंदूर पर्वतावर येऊन राहिलास ह्मणजे ह्या ठिकाणीं तुझ्या दर्शनार्थ दररोज

मोठी यात्रा येऊं लागेल, ५८ त्यांत देव, मनुष्य, ऋषि इत्यादि सर्व येतील, ते प्रथम माझें दर्शन न घेतां जर तुझें दर्शन घेतील ५९ तर त्यांची यात्रा निष्फल व्हावी, हा तिसरा वर जाण ६० राम सांगतात—जे तूं तीन वर मागितलेस ते सर्व पूर्ण होवोत, कारण तूं लोकोपकारार्थ अत्युग्र तप केलें आहेस. ६१ ह्या प्रमाणें रामचंद्रापासून वर मिळवून, आपला देह लिंग रूपानें त्या पर्वतावर ठेऊन, ज्या ठिकाणीं गेलें असतां पुनरावृत्ति नाहीं अशा वैकुंठ लोकीं तो प्राप्त झाला ६२ नं-

आगमिष्यंतियेदेवामनुष्यऋषयःस्तथा ॥ आदौमान्नहिपश्यंतिप्रथमंचागतास्त्वयि ॥ ५९ ॥ तेषांयात्राफलंनैवभविष्यतुतवाज्ञया ॥ त्रितीयोऽयंवरोदेवदोहिमेप्रियहर्शन ॥ ६० ॥श्रीराउ० ॥ संतुयेयाचिताःकामाःपरिपूर्णपरेहितां ॥ परोपकारणार्थायेयत्तपश्चारितंत्वया ॥६१। वरंलब्ध्वापरंस्थानंगत्वावैकुंठमंदिरं ॥ यंप्राप्तोनैननिवर्ततेतद्धामपरमंययौ ॥ ६२ ॥रामोऽपितमनुज्ञाप्यलक्ष्मणेनसहायवान् ॥ गतोहनुमतासार्द्धंसाकेतेपरयामुदा ॥ ६३ ॥लब्धसंज्ञस्तदाक्तोवोस्मृतोवैपुनरुत्थितः ॥ दृष्ट्वापुत्रंसमालिंग्यमुमुदुस्तातमातैरा ॥ ६४ ॥ चक्रेयोध्यांमहोत्साहंकौशल्यापरयामुदा ॥ हर्षेणानिर्भरौजातौशत्रुघ्नभरतौतदा ॥ ६५॥ इतिश्रीपद्मपुराणेसिं०म०धूम्रपमहिमावर्णनंनामचतुर्दशोध्यायः समाप्तः ॥ १४ ॥ छ

तर रामचंद्रही त्याला अनुज्ञा देऊन लक्ष्मण आणि मारुती ह्यांसह मोठ्या आनंदानें अयोध्येप्रत प्राप्त झाले ६३ तत्काल तो ब्राह्मणाचा मृतपुत्र जिवंत झाला. हें पाहून त्याचे मातापितर त्याला दृढ आलिंगन देऊन आनंद पावले ६४ तेव्हां कौसल्येनें अयोध्येंत मोठा उत्सव केला. आणि शत्रुघ्न ह्यांस मोठा आनंद झाला ६५ इति प० सिं० धूम्रप महिमा वर्णनं नाम चतुर्दशो ध्यायः १४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

अध्याय १५ व १६ छापत आहेत ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

पार्वती प्रश्न करिते महाराज नंतर रामचंद्र त्या पर्वतावर काय करिता झाला, आणि त्या शूद्राच्या नरि, आणि नारि ह्या स्त्रिया कोठें गेल्या १ शंकर सांगतात प्रिये, नंतर त्या स्त्रिया रामाला नमस्कार व प्रदक्षिणा करून प्रार्थित्या झाल्या कीं आह्मी वृत्र दैत्याच्या आश्रमीं जातों आह्माला आज्ञा दे २ तेव्हां राम विचारितात— त्या ठिकाणीं तुमचे माता पितर अथवा पुत्र कोण आहेत, बरें तुह्मी त्याच्या जवळ जाऊन कोठें वास कराल? त्या ठिकाणीं तुह्मी जाऊं नका मीं तुह्माला दुसरें स्थान सांगतों ३ नरि, नारी ह्मणतात— त्या ठिकाणीं आमचा एक वेत्रवती नांवाचा विंध्यपर्वतावर गुप्त आश्रम आहे, त्या

पार्वत्युवाच० ॥ किंचकारततोराजारामस्तत्रतपंगिरौ ॥ शूद्रपत्न्यौनरीनार्यौक्वगतेतेपिनाकधृक् ॥ १ ॥ ईश्वरउ० ॥ रामंप्रदक्षिणीकृत्याविज्ञाप्यत्वरितमुभे ॥ वृत्रदैत्याश्रमंराजन्यास्यामस्त्वदनुज्ञया ॥ २ ॥ श्रीरामउ० ॥ केसंतितत्रयुवयोःपितामाताथवासुतः ॥ तस्यपार्श्वेनगंतव्यंगतिंवक्ष्यामिवोऽधुना॥ ३॥नरीनारीऊचतुः॥आश्रमोविद्यतेदेवउभयोर्विंध्यपर्वते॥ नामवेत्रवतीयस्यदेवदैत्यैर्नगम्यते॥ ४॥श्रीरामउ०॥अगम्यायात्वयाप्रोक्तादुर्गादुर्गोपमाशुभे॥ तत्रगत्वाक्वचिद्द्रष्टुंकथंसाविद्यतेऽनघे॥ ५ ॥नरीनार्यौचतुः॥त्वय्यैवतत्रतिष्ठतकथंजातेदुरासदम् ॥ आगतस्यमयानाथकथंज्ञानोपलक्षणं ॥ ६ ॥ संकेतंदेहिमेसमयेनज्ञानंनभविष्यति ॥ श्रीरा०उ० ॥ पूरयामिमहाशंखमरीणांहृदिदारकं॥ ७ ॥श्रुत्वाशंखध्वनिंत्तत्रएहिशीघ्रंममांतिकं ॥ तदातुभ्यंप्रदास्यामिपरंज्ञानस्यसाधनं ॥ ८ ॥ तदागच्छत्पदंसुभ्रूर्नेनरीनारीकनीय

ठिकाणीं देवदैत्यांचाही प्रवेश नाहीं ४ राम ह्मणतात- तह्मी ती वेत्रवती अगम्यआहे म्हणून सांगतां तर त्या ठिकाणीं गमनकरणें असल्यास तें कसें होईल व तेंकसें अगम्य आहे ५ नरी, नारी सांगतात—रामा तूंच जर येऊं लागलास तर कांहीं अगम्य नाहीं- परंतु तूं आलास हें आह्मी समजावें कसें ६ तेव्हां आह्माला कांहीतरीं खुण सांग कींज्या खुणेनें तूं आलास असें आह्मी ओळखूं. राम ह्मणतात मीं त्या स्थानीं येतांच मोठा शंख वाजवीन, तो शब्द श्रवण करितांच शत्रूंचीं हृदयें विदारणच होतील ७ तो शब्द श्रवण करतांच तुह्मी माझ्या समीप या ह्मणजे मी तुह्माला परब्रह्मज्ञानाचें साधन सां-

गेन ८ नंतर ती नरी व तिची धाकटी सवत नारी शीघ्र आपल्या स्थानीं गेल्या महादेव ह्मणतात पार्वति ह्या प्रमाणें त्यानां आश्रमीं पाठवून, मारुती सहवर्तमान ९ रामचंद्र, लक्ष्मण आणि सीता ज्या ठिकाणीं होतीं त्या ठिकाणीं प्राप्त झाला. आणि त्या स्थानीं आपलें एक कलारूप स्वरूप गुप्त करून ठेविलें १० तें स्थान गुप्तराम ह्या नांवानें सिंदूर पर्वतावर प्रसिद्ध आहे. नंतर पर्वताच्या मध्यभागीं येतांच पुष्कर तीर्थ पाहिलें ११ त्या तीर्थाचें उदक पाहतांच भक्तीनें राम त्या ठिकाणीं गेला आणि विमानांतून उतरला १२ आणि निर्मल, सुगंध व कमलांनीं युक्त अशा त्या उदकांत मा-

सी ॥ महादेवउ० ॥ प्रेषितेशूद्रपत्न्यौसहनुमान्साहितःपुनः ॥ ९ ॥जगामतत्रवैतूर्णयत्ररामः सीतासलक्ष्मणा ॥ कृतंगुप्तंस्वमात्मानंन्यस्यतत्रकलांशकं ॥ १० ॥गुप्तंरामाभिधंतेनख्यातंसिंदूरपर्वते ॥ ददर्शपौष्करंतोयंमध्यस्थःपुरतःस्थितं ॥ ११ ॥तीर्थोदकंजगामाथश्रद्धयाचरघूत्तमः ॥ उत्तीर्णास्तेविमानाधस्तुष्टाहृष्टाःपरस्परं ॥ १२ ॥संप्राप्यपुष्करंनीरंप्रविवेशसवानरः ॥ सुगंधंनिर्मलंनीरंव्योमाकारंसपुष्करं ॥ १३ ॥उपर्युपरिपश्यंतोवेलाक्रमणदुःसहं ॥ महावायुहतावेलाप्लावयंत्ति गिरिंशुभाः ॥ १४ ॥मज्जंतिसिद्धगंधर्वागुहागव्हरवासिनः ॥ छिन्नैःकमलकल्हारैस्तीरेचैवशुभावहे ॥ १५ ॥राजहंसैश्चक्रवाकैस्तथाचकोरकैर्युतं ॥ कुमुदैःकर्शितेरात्रौआकाशमिवशोभिते ॥ १६ ॥भ्रमरैश्चोदितंसर्ववनंपुष्करजंप्रिये ॥ पक्षिरूपेणतेसर्वेविचरंतिनदीनदाः ॥ १७ ॥तंवीक्ष्यविस्मयंप्राप्तोरघुराजोपुष्करंतदा॥आहूय

रुतीसह प्रवेश करिता झाला १३ तें पुष्कर सरोवर दुरून पाहिलें असतां समुद्रासारखें भासलें. आपल्या लाटांनीं पर्वताला बुडवून टाकितें काय असा भास होतो १४ त्यांत पर्वताच्या गुहेंत राहणारे सिद्ध, गंधर्व स्नान करीत होते, त्याच्या तीरावर कमलें पडलेलीं होतीं १५ राजहंस, चक्रवाक, चकोर त्याच्या तीरावर मधुर शब्द करीत होते. त्यांत कुमुदें प्रफुल्लित झालेलीं होतीं, तें निरभ्र आकाशा सारखें स्वच्छ दिसत होतें १६ त्यांतील कमलांवर भ्रमर मधुर मधुर गुंजारव करीत होते, त्या भ्रमरांच्या रूपानें सर्व नद्या आणि नद हे त्या सरोवरांत प्रवेशच करीत आहेत काय असा भास होत

असे १७ असो. असें तें पुष्कर तीर्थ पाहतांच रामचंद्र अत्यंत आनंदित झाला आणि लक्ष्मणाला हाक मारून त्यासह वर्तमान स्नान करण्याला तयार झाला १८ आणि मृत्तिका, गोमय, भस्म, तिल, दर्भ इत्यादि पदार्थ संपादन करून विधिपूर्वक सपत्नीक, लक्ष्मण व मारुती ह्यांसह स्नान करिता झाला १९ आणि तीरावर येऊन वस्त्र परिधान करून मौन धारण करून माध्यान्हिक सर्व विधि करून २० मौन विसर्जन करून सुखासनावर बसला. त्याच्या दक्षिण वाम भागीं सीता व लक्ष्मण २१ आणि अग्रभागीं हस्त जोडून सेवेविषयीं तत्पर असा मारुती बसला आणि विनोदानें नंतर

लक्ष्मणंरामःस्नानार्थंचोद्यतोऽभवत् ॥ १८ ॥मृद्गोमयातिलैर्दर्भैर्विधियुक्तेनकर्मणा ॥ स्ना
तौतौदंपतीतत्रसौमित्रिमारुतात्मजः ॥ १९ ॥उत्तीर्यवाससीगृह्यपरिधायसुमध्यमे ॥
आलंब्यमौनंयत्नेनकृत्वामाध्यान्हिकींक्रियां ॥ २० ॥मौनंविसृज्यसुश्रोणिउपविष्टःसुखा
सने ॥ समीपेलक्ष्मणःश्चाग्रेमैथिलीउपपश्चिमे ॥ २१ ॥उपासनेहारिस्तत्रपुरोऽतिष्ठत्कृतां
जलिः ॥कुर्वंतोविविधागोष्ठीर्विनोदेनपरस्परं ॥ २२ ॥तदंतरेपृथुश्रोणिपुष्करेणकृतंतुयत् ।
धृत्वाचब्राह्मणरूपमागत्यपुरतस्थितः ॥ सुगंध पुष्पमालां वैददौतस्मैचपार्वति॥ २३ ॥
प्रणम्यचयथान्यायंउवाचश्लक्ष्णयागिरा ॥ २४ ॥ सुकोमलाच।निर्घोषवेदश्लोक
समश्रुतिं ॥ पुष्करउ० ॥ यस्यपादौक्षितिःपूर्णागगनंनाभिरूच्यते ॥ २५ ॥ दिशःश्रो
त्रेप्रवर्ततेतिष्ठतेदिविशीर्षकं ॥ स्तुतिंचकारवेदोक्तांब्रह्माविशिवैःकृता ॥ २६ महादे

ते सर्व अनेक प्रकारच्या गोष्टी परस्परांशीं बोलूं लागले २२ हे नितंबिनि इतक्यांत पुष्कर तीर्थानें ब्राह्मणाचा वेष घेऊन रामचंद्राच्या अग्रभागीं येऊन २३सुगंध पुष्पांच्या माला रामचंद्राच्या कंठीं अर्पित करून नमस्कार करून मधुरवाणीनें २४ वेदांनीं जशी स्तुति केली आहे तशी त्याच वृत्तीं त्यांची स्तुति केली. पुष्कर ह्मणते पृथिवी ही ज्याचे पाद, आकाश ज्याची नाभि,२५ दिशा ज्याचे कर्ण, स्वर्ग लोक ज्याचें मस्तक, इत्यादि ब्रह्मा, विष्णु आणि शिव हे ज्याची निरत स्तुति करितात तो तूं अशी ब्रह्मादि देव स्तुति करिते झाले २६ महादेव ह्मणतात—पार्वति इकडे ब्रह्मदेव ब्रह्मलोकीं सुखा-

सर्नी बसला असता, सर्वदेव, इंद्रादि दिक्पाल, अष्टौवसु, द्वादशादित्य, एकादशरुद्र सिद्धविद्याधर, किन्नर, सर्प, २७ सप्त-ऋषि, सप्तकुलाचल, ह्यां सहवर्तमान ब्रह्मदेव बसल असतां त्यांच्या समीप कलीला प्रिय जो नारद तो प्राप्त झाला २८ आणि साष्टांग नमस्कार करून आपल्या पित्याला नम्रतेनें बोलूं लागलाहे—ताता! वीरशिरोमणि रघुश्रेष्टरामचंद्र २९ सिंदू पर्वतावर पुष्कर तीर्थी प्राप्त झाला आहे. हें नारदाचें भाषण श्रवण करतांच तत्काल ब्रह्मदेव आसना वरून उठला ३० आणि सर्व देवां सहवर्तमान, ज्या ठिकाणीं रामचंद्र होता त्या ठिकाणीं सिंदूर पर्वतावर पुष्कर तीर्थि प्राप्त झाला ३१ आणि

वउवाच ॥ ब्रह्माणंचसुखासीनंसदिक्पालैःसहामरैः ॥ सेंद्राःसवासवोदित्याःसिद्धविद्याधरोरगाः ॥ २७ ॥ सप्तर्षयःपर्वताःसुभ्रूआगताब्रह्मणोंतिकं ॥ नारदस्तत्रदेवेशिप्राप्तोहर्षप्रदःपितुः ॥ २८ ॥ प्रजापतिंनमस्कृत्यप्रोवाचेदंक लिप्रियः ॥ नारदोवा०॥आगतोऽसौमहावीरोरामःसत्यधुरंधरः ॥ २९ ॥ सिंदूरेभूधरेब्रह्मन्वर्ततेपुष्करेधुना ॥ नारदस्यवचःश्रुत्वाउत्थायकमलासनः ॥ ३० ॥ आसमन्तात्सभासार्द्धमागतस्तंतपंगिरिं ॥ यत्ररामोमहाबाहुःपुष्करेतिष्ठतस्वयं ३१ अंतरिक्षेस्थिताःसर्वविमानैःस्वर्णभासुरैः रामतंदेदृशुःसर्वेपुष्करेणसमन्वितं ३२ दृष्टारामेणतेसर्वेबभाषेपुष्करंप्रति श्रीरामउवा० स्तुतिवादमलंब्रह्मन्विज्ञातंतवकारणं ३३ आगतस्त्वमहाभागयेन कामेनमांप्रति पुष्करोऽपिसमुत्थायरामंप्रतिकृतांजलिः ३४ दृष्ट्वातमब्रवीद्ब्रह्मा राघवंसहलक्ष्मणं ब्रह्मोवाच० द्विजोऽयंपुष्करंविद्धिदितीयंज्येष्ठपुष्करं ३५ ७

सर्व देवां सहवर्तमान अंतरिक्षीं राहून विमानांतून रामचंद्र आणि पुष्कर ह्यांचा संवाद श्रवण करिते झाले ३२ रामचंद्राने ही त्या सर्वांस पाहिलें आणि पुष्करा प्रत भाषण करूं लागला. हे ब्राह्मणा आतां स्तुति पुरे मी तुझ्या स्तुतीचें कारण समजलों ३३ तूं जोमनोरथ धारण करून प्राप्त झाला आहेस तो मी समजलों तात्काल तो ब्राह्मण ही रामाच्या पुढें हस्त जोडून नम्र झाला ३४ हें पाहून ब्रह्मदेव रामचंद्रा प्रत भाषण करितो—हे रामचंद्रा हा ब्राह्मण पुष्कर तीर्थ आहे असें जाण ३५

हें पापाच्या भारानें आक्रांत झाल्यामुळें तुला शरण आलें आहे. आतां तुझ्या चरणदर्शनानें पाप रहित झालें ३६ स्वाभाविक तुझ्या चरण स्पर्शानें त्रिभुवन पवित्र होतें. आणि ह्याला तर तूं बुद्धिपूर्वकच पवित्र केलेंस ३७ ह्याच्या ठिकाणीं तीर्थ बुद्धि करून तूं विधिपूर्वक स्नान केलेंस. तस्मात् हें पुष्कर अति पवित्र झालें. पूर्वीं हें आमच्या स्नानानें पवित्र होतेंच पण आतां तें अतीशयच पवित्र झालें ३८ आतां ह्याहून पवित्र असें त्रैलोक्यांत दुसरें कोणतेंच तीर्थ नाहीं. ह्या तीर्थीं स्नान केल्यानें ब्रह्महत्यादि समस्त पातकें नाश पावतात ३९ पूर्वीं ईशाल असें ह्याचें नाम होतें, नंतर पुष्कर हें

पापभारभराक्रांतमागतंतवसन्निधिं ॥ विधूतकल्मषंजातंरामस्तेपुण्यदर्शनात् ॥ ३६ ॥ तवांघ्रिपंकजेनेदंपवित्रंभुवनत्रयं ॥ बुद्धिपूर्वंत्वयारामपुष्करंपावनंकृतं ॥ ३७ ॥ तीर्थभावंसमुद्दिश्यस्नातायूयंयथाविधि ॥ कृतंगंगासमंचेदंपुरास्माभिर्विनिश्चितं ॥ ३८ ॥ अस्मात्परतरंनास्तित्रिषुलोकेषुपावनं॥निरस्तंस्नानमात्रेणब्रह्महत्यादिपातकं ॥ ३९ ॥ ईशालाख्यंपुरानामाअधुनापुष्करंशुभं॥रामतीर्थमिदानींतुरामस्नानेनतेभवेत् ॥ ४० ॥ कार्तिकेमासेसंप्राप्तेयःस्नातिविधिवन्नरः ॥ प्रातरुत्थायमासंतुरामतीर्थेदिनेदिने ॥ ४१ ॥ सुस्नातःसर्वतीर्थेषुसत्यमेवंनसंशयः ॥ तीर्थमेनंसंसेव्यैतदुर्ज्ञेयंपरमार्थतः ॥ ४२ ॥ द्वादशाब्दंफलंतस्यनिश्रेयसकरंपरं ॥ अबुध्यायन्महत्पापंकृतंतच्चविनश्यति ॥ ४३ ॥ अश्व

नाम ह्याला प्राप्त झालें. आतां तूं ह्यांत स्नान केलेंस ह्मणून आज पासून रामतीर्थ ह्या नांवानें हें प्रसिद्ध होईल ४० कार्तिक मास प्राप्त झाला असतां प्रातःकालीं उठून विधिपूर्वक जो ह्या रामतीर्थीं स्नान करील ४१ त्याला सर्व तीर्थांचें स्नान केल्याचें फल प्राप्त होईल ह्यांत संशय नाहीं. तो स्नान मात्रानें आपणही तीर्थरूप होईल ४२ इतर तीर्थीं द्वादशवर्षें स्नान केल्याचें फल ह्या तीर्थीं एक वार स्नान केल्यानें प्राप्त होतें. अज्ञानानें केलेलें पातक तत्क्षणीं नाश पावतें ४३

अश्वमेधादि यज्ञ केल्याचें फल प्राप्त होतें. ब्रह्मदेव ह्मणतो हे देवा हें भाषण यथार्थ आहे. हें मी नास्तिक्यानें बोललों नाहीं ४४ जो ह्या रामतीर्थीं स्नान करील, त्याला सर्व व्रतें केल्याचें, सर्व तीर्थीं स्नान केल्याचें आणि सर्व दानें दिल्याचें फल प्राप्त होईल ४५ त्रैलोक्यांतील सर्व तीर्थामध्यें हें श्रेष्ठ आहे असें, माझ्या भाषणावरून सर्वांनीं समजावें. हें सत्य आहे ह्यांत अन्यथा नाहीं ४६ कार्तिक स्नानादिकांचा जो विधि धर्मशास्त्रांत सांगितला आहे तो समग्र ह्या तीर्थीं आचरण करावा ४७ जो तो विधि करणार नाहीं त्यास स्नानाचें फल प्राप्त होणार नाहीं. विष्णु सारखा दुसरा देव, ब्राह्मणा

मेधादिकायज्ञाइष्टास्तेनसुनिश्चितं ॥ मंतव्यंदेवमद्वाक्यंनास्तिक्यंनमयोदितं ॥ ४४ ॥
सर्वव्रतफलंतस्यसर्वतीर्थफलंध्रुवं ॥ सर्वदानफलंतस्यरामतीर्थावगाहनात् ॥ ४५ ॥
लोकेषुसर्वतीर्थेभ्योवरिष्ठंवर्ततेत्विदं ॥ मद्वाक्यात्सकलैर्ज्ञेयंसत्यंसत्यंनचान्यथा ॥४६॥
योविधिःकार्तिकेदृष्टोविध्युक्तःस्मृतिचोदितः ॥सविधिस्तत्रकर्तव्योवित्तशाठ्यंविनाशुभे
॥ ४७ ॥ नकुर्वंतिनरास्तत्रतेषांस्नानफलंनहि ॥ नविष्णोःपरतोदेवोनगुरुर्ब्राह्मणःनरः
॥ ४८ ॥ रामतीर्थात्परंतीर्थंनभूतंनभविष्यति ॥ माघमासेनरःस्नानंप्रयागेचनिरंतरं
॥४९॥ रामतीर्थेसकृत्स्नानंकार्तिकेनवमीतिथौ ॥कार्तिकेमासेसंप्राप्तेव्यतीपातेचयत्फलं
॥ ५० ॥प्राच्यांसरस्वत्यांस्नात्वारामतीर्थेततोऽधिकं ॥ कार्तिकेशुक्लपक्षेतुएकादश्यावगाह

सारखा दुसरा गुरु नाहीं ४८ आणि रामतीर्थासारखें दुसरें तीर्थ पूर्वीं कोठें झालें नाहीं व पुढें ही होणें नाहीं. माघ मासांत प्रयागीं निरंतर स्नानाचें जें फल ४९ तें कार्तिक शुद्ध नवमीस रामतीर्थीं स्नान केल्यानें प्राप्त होतें. कार्तिकमासांत व्यतीपात योगावर रामतीर्थीं स्नानानें जें फल प्राप्त होतें तें ५० पूर्व वाहिनी सरस्वतीच्या स्नानाहूनही अधिक होय. कार्तिक शुद्ध एकादशीला रामतीर्थीं ज्यानीं स्नान केलें ५१ त्यानीं जप, दान, हवन, वेदपारायण हीं सर्व कर्में केलीं.

त्या तीर्थीं द्वादशीच्या दिवशीं ५२ स्नान करून पिंडदान केलें असतां पितर अक्षय तृप्ति पावतात. रेवती नक्षत्र, रवि-
वार आणि द्वादशीतिथी अमा योग आला असतां ५३ रामतीर्थीं स्नान करावें ह्मणजे परमपद प्राप्त होतें. अशी द्वादशी
प्राप्त होणें फार दुर्लभ आहे ५४ आणि रामतीर्थीं तर ती फारच दुर्लभ होय हें ब्रह्मवचन आहे. कुमुदेंदु द्वादशी असें
ह्या द्वादशीचें नाम आहे. हिचें माहात्म्य वर्णन करण्याला मीही समर्थ नाहीं ५५ ह्या द्वादशीचे दिवशीं जो रामतीर्थीं

नात् ॥५१॥ तेनदत्तंहुतंजप्तंवेदपारायणंकृतं ॥ यत्रकुर्वंतिराजेंद्रउत्तमेद्वादशीदिने ॥५२
स्नानंपिंडप्रदानंचतुष्टास्युःपितरश्चिरं ॥ रेवतीरविवारेणद्वादशीसायदाभवेत् ॥ ५३ ॥
रामतीर्थेनरःस्नात्वासयातिपरमंपदं ॥ द्वादशीसामहाराजदुर्लभापुष्करेसदा ॥ ५४ ॥
रामतीर्थेविशेषेणब्रह्मणोवचनंयथा ॥ कुमुदेंदुद्वादशींचकथांवक्तुंनशक्नुमः ॥ ५५ ॥
रामतीर्थेसकृत्स्नातिपरांगतिमवाप्नुयात् ॥ कुमुदेंदुद्वादशींचज्ञात्वापुष्णातियोद्विजः ।५६।
क्षमोनारायणोवक्तुंनान्योजानातिगौरवं ॥ रेवतीरविवारेणकदाचिद्वादशीयदि ॥५७
सप्तजन्मार्जितंपापंनश्यतेस्नानमात्रतः ॥ योभीष्मपंचकेदेविस्नातिचेद्विधिवन्नरः ॥५८
त्रिसंध्यंचापितस्यस्यात्सर्वपापविनाशनं॥तुलावृश्चिकसंक्रांत्यौसकृत्स्नातिनरोध्रुवं ॥५९॥

स्नान करील त्याला मोक्ष प्राप्त होईल. ह्या द्वादशीस जो उपोषण करील ५६ त्याचें पुण्य वर्णन करावयास साक्षात् ना-
रायणच समर्थ होईल तर होईल, इतर कोणी समर्थ नाहीं. ही कुमुदेंदु द्वादशी दैव योगानें प्राप्त झाली असतां ५७ ह्या
रामतीर्थाच्या स्नानमात्रानेंच सप्तजन्मार्जित पातकांचा नाश होतो. जो भीष्म पंचकांत ह्या तीर्थीं त्रिकाल विधिपूर्वक
स्नान करील ५८ त्याच्या सर्व पातकांचा नाश होईल. तुला आणि वृश्चिक ह्या संक्रांतींच्या दिवशीं जो एकवार स्नान
करील ५९ त्याला वर्षपर्यंत नित्य स्नानाचें फल प्राप्त होतें. आणि सर्व पातकांचा नाश होतो. चतुर्दशीच्या दिवशीं

तिल आणि आमलक आणि सर्षप ह्यानीं ६० जे दंपती स्नान करितात त्यांस तीन वर्षेपर्यंत नित्य स्नान केल्याचें फल प्राप्त होतें. कार्तिक पोर्णिमेच्या दिवशीं व्रतस्थ होऊन रामतीर्थी ६१ वपन करून स्नान करावें, पिंडदान पुरःसर श्राद्ध करावें, मौन धारण करून देवपूजन करावें ६२ तसेंच इंद्रियदमन, ध्यान, मनन, सत्य भाषण हीं सर्व रामतीर्थी आच-

विधूतकल्मशोभूत्वावर्षस्नानफलंलभेत् ॥ चतुर्दशीदिनेसुभ्रूतिलामलकसर्षपैः ॥६०
यौस्नातौदंपतीतत्रवर्षत्रयफलंलभेत् ॥ कार्तिक्यापौर्णमास्यांवैरामतीर्थेदृढव्रतः ॥ ६१
वपनंस्नानदानंचतर्पणंपिंडपातनं ॥ श्राद्धंमौनंचयजनंपूजनंदमनंचयत् ॥ ६२ ॥
ज्ञानंचमननंध्यानंसत्यवाचंचमार्दवं ॥ रामतीर्थेतुतत्सर्वमक्षय्यंभवतिध्रुवं ॥ ६३ ॥
यत्कृतंपुण्यपापंचतदानंत्यायकल्पते ॥ ईश्वरउवाच ॥ एवमुक्त्वाततोब्रह्मादेवैःसह
दिवंगतः ॥ ६४ ॥ पुष्करस्यचमाहात्म्यंकथितंचमयाद्भुतं ॥ ६५ ॥ इतिश्रीपद्मपु
राणेसिंदुराद्रिमहा०पंचदशोध्यायःसमाप्तः ॥ १५ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

रण केलीं असतां अक्षय होतात ६३ जें पुण्य किंवा पाप करावें तें सर्व अक्षय होतें. शंकर सांगतात, हे गिरिजे असें त्याचें माहात्म्य वर्णन करून ब्रह्मदेव सर्व देवांसह स्वस्थानीं गेला ६४ ह्या प्रमाणें हें पुष्कर तीर्थाचें माहात्म्य मीं तुला सविस्तर वर्णन केलें ६५ इति० प० सिं० पंचदशोध्यायः ॥ १५ ॥ ॥ ॥ ॥ ॥

पुनः पार्वती प्रश्न करिते—महाराज नंतर भगवान् रामचंद्र, यांनीं काय केलें? सीता, लक्ष्मण, मारुति ह्यांसह वर्तमान त्या तीर्थीं वास केला कीं काय? १ शंकर सांगतात, हे गिरिजे नंतर रामचंद्र, सीता, लक्ष्मण, मारुति ह्यांसह पुष्पक विमानांत बसून क्षणमात्रानें अयोध्येप्रत प्राप्त झाला २ आणि त्या द्विजबालकाला जीवंत झालेला पाहून आनंदानें ब्राह्मणाप्रत बोलूं लागला—हे द्विजश्रेष्ठा तुझें कुशल आहेना? तुझा पुत्र कुशल आहेना? ३ मीं जी पूर्वीं प्रतिज्ञा केली तीपासून मी पार पडलोंना? हे द्विजश्रेष्ठा तुझा पुत्र जिवंत झालाना? ४ हे ब्राह्मणा बोल बोल. तेव्हां तो ब्राह्मण ह्मणतो, हे प्रभो

पार्वतिउ० ॥ किमकुर्वतरामोवैरामतीर्थेवृषध्वज ॥ स्थितिंचक्रेततोवापिसीतालक्ष्मणवानरैः ॥ १ ॥महादेवउ० ॥ आरुह्यपुष्पकंरामोजगामस्वांपूरींप्रति ॥ निमिषार्धेनसंप्राप्तोसीतावानरलक्ष्मणैः ॥ २ ॥जीवन्तंबालकंदृष्ट्वामुमुदेराघवःप्रिये ॥ रामउ० ॥कुशलंतेद्विजश्रेष्ठबालकःकुशलस्तच ॥ ३ ॥उत्तीर्णोऽहंद्विजश्रेष्ठप्रतिज्ञायत्कृतापुरा॥ जीवितोजीवितोबालोजीवितोऽयंमुनीश्वर॥ ४ ॥ब्रह्मनब्रूहिपुनर्ब्रूहिपुनर्ब्रूहिममांतिकं॥ आनिंद्योहमानिंद्योऽहमनिंद्यस्त्वमपिप्रभो ॥ ५ ॥यन्मयावचसाचोक्तंतुभ्यंदेवक्षमस्वमां॥द्विजउ० ॥ उत्तीर्णस्त्वंमहाभागप्रीतज्ञायास्तुराम‌राट् ॥ ६ ॥स्वजन्ममंदिरंगच्छकुशलंतेभविष्यति॥ महादेवउ० ॥ संप्रेष्यब्राह्मणंरामोबंधुभिःपरिवारितः ॥ ७ ॥ प्रविवेशमहाराजाविश्वकर्माकृतंगृहं ॥ गृहमध्येसभायांचपौरैः सहपुरोधसा ॥ ८ ॥ ॥ ॥ ॥ ॥

तूंच व मी हे दोघेही आतां लोकांच्या निंदेपासून मुक्त झालों? ९ जें पूर्वीं मी तुला बोललों, त्याची क्षमा कर. हे दैववान् रामराजा तूं प्रतिज्ञेपासून पार पडलास ६ आतां तूं आपल्या घरीं जा तुझें कल्याण असो. महादेव सांगतात हे प्रिये असें ब्राह्मणाचें भाषण श्रवण करून त्याला आपल्या आश्रमीं जावयास आज्ञा देऊन रामचंद्र सर्व परिवार मंडळी सह ७ पुरोहित, नागरिक जन ह्यांसह वर्तमान विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या सभेंत प्रवेश करिता झाला ८

त्या ठिकाणीं सर्व मंगलमय झालें आणि रामचंद्राच्या पुनः सुखरूपआगमनानें सर्व प्रजा संतोष पावल्या ९ सर्वांनीं रामाला वंदन केलें. रामचंद्रानें ही त्यांचा यथायोग्य तांबूलादि दानानें सत्कार केला. अशा रीतीनें रामचंद्रानें त्या गृहाची प्रतिष्ठपना केली १० आणि भार्या, भ्राते, कुलगुरुवसिष्ठ, ह्यां सह पारणा करिताझाला ११ नंतर कोणी एके दिवशीं रामचंद्र वसिष्ठाप्रत भाषण करिता झाला-गुरुजी आपली आज्ञा होईल तर अश्वमेध करावा असा माझा मनोरथ आहे १२ वसिष्ठ

वृद्धामात्यैस्तत्ररामःकुशलंकुशलंततः ॥ राघवेणप्रजाःसर्वाःकुशलेनप्रहर्षिताः ॥ ९ ॥ राघवंतेप्रणेमुस्ताःप्रजास्तानभिवाद्यच ॥ पुष्पतांबूलवाक्पण्यैस्तोषितंस्थापितेगृहे ॥ १० ॥ पारणंकृतवान्रामोभ्रातृभिःसहभार्यया ॥ सपत्नीकैर्द्विजैःसार्द्धवशिष्ठेनपुरोधसा ॥ ११ ॥ सुप्रीतमनसारामोवशिष्ठंप्रत्युवाचवै ॥ अश्वमेधमखंतातकरिष्येऽहंतवाज्ञया ॥ १२ ॥व शिष्ठउ० ॥ दत्तानुज्ञामयारामकुरुष्वाविघ्नमस्तुमे ॥ लब्ध्वानुज्ञांकृतोयागस्तोषितास्तेदिवौकसः ॥ १३ ॥ब्राह्मणाःक्षत्रियावैश्याःशूद्राश्चसचराचराः ॥ सुप्रीतास्तुकृतास्तेनअश्वमेधावसानतः ॥ १४ ॥तीर्थयात्रांसमुद्दिश्यगतोऽसौसिंदुराचलं ॥ देवप्रियाख्यविप्रेणसमाहूतोऽथतैःसह ॥ १५ ॥सलक्ष्मणहरिभ्यांचसीतयासहभार्यया ॥ तपंगिरिमनुप्राप्तोह्यगास्तियत्र

सांगतात रामा अश्वमेध करण्याविषयीं माझी पूर्ण संमती आहे. तूं अश्वमेध कर. तुला अविघ्न असो. ह्या प्रमाणें वसिष्ठाची संमति संपादून अश्वमेध करून रामचंद्रानें सर्व देवांनां संतुष्ट केलें १३ आणि अश्वमेधाच्या शेवटीं ब्राह्मण, क्षत्रिय,वैश्य, शूद्र व इतर सर्व वर्ण ह्यांस वस्त्रालंकार देऊन संतोषविले १४ आणि कोणी देवप्रिय नांवाचा ब्राह्मण बालवायास आला असतां त्या बरोबर तीर्थयात्रेसाठीं ह्मणून १५ सीता, लक्ष्मण,, मारुती ह्यांसहवर्तमान सिंदूरपर्वतावर अगस्तिऋषीच्या आश्र

मीं प्राप्त झाला १६ आणि त्या ऋषीला सर्वांनीं साष्टांग नमस्कार केला. तत्काल त्या ऋषीनें तवांस बसावयास आ-
सनें दिलीं १७ आणि इतक्यांत देवगण तेथें येऊन अगस्तीला प्रणाम करून रामाप्रत स्वागत करिते झाले. अगस्ती-
नेंही रामचंद्राची मधुपर्कविधानें षोडशोपचार पूजा केली १८ आणि त्यांस उत्तम भोजन देऊन पुनः रामचंद्र आसनावर
बसल्यानंतर त्या परमेश्वरास सात्विकतेनें वंदन करून अगस्ति प्रश्न करितो १९ हे रामा तूं पूर्वीं ह्या पर्वतावर येऊन तप
करणाऱ्या त्या शूद्राचा नाश करून गेलास आणि आतां पुनः आलास ह्याचें कारण काय? २० हे ऋषिवर्या त्याच शू-

तिष्ठति ॥ १६ ॥ आगतास्तेसुराःसर्वेदृष्ट्वागस्तिंप्रणम्यते ॥ स्वागतंसांप्रतंरामसीतया
लक्ष्मणेनच॥ १७ ॥इत्युक्त्वाराघवंदेविमधुपर्कादिकंद्विजः॥अगस्तिनामहाभागेराघवः
पूजितस्तदा ॥ १८ ॥ संभोज्यसादरंसर्वान्नत्वापरमसात्विकः ॥ तत्रैवचसुखासीनंरामं
पप्रच्छकुंभजः ॥ १९ ॥अगस्तिरुवाच ॥ आगतस्त्वंमहावीरकारणंतद्वदस्वमे ॥ हत्वा
शत्रुंगतस्त्वंहिपुनःकुत्रागतोऽसिवै ॥ २० ॥रामउवाच॥शूद्रेणयाचितोऽहंवैत्वत्रातिष्ठन
राधिप ॥ तेनाहंसत्यवाक्बद्धःपुनस्थातुमिहागतः॥ २१ ॥अगस्तिरुवाच ॥मदीयेचास
नेतातातिष्ठत्वंसत्यसंगर ॥ इदानींगंतुकामोऽहंदेवकार्यान्नृपोत्तम॥ २२ ॥रामउवाच॥
अहमत्रागतोब्रह्मन्नेननयूयंप्रकोपिताः ॥ आश्रमंत्यज्यविप्रेंद्रकिमर्थंगम्यतेविभो॥ २३॥
अगस्तिरुवाच॥नकदाचित्वयासार्द्धंक्रोधोमांराजतेविभो॥कथितंतेमयापूर्वंदेवकार्यंमम

द्रानें माझ्यापाशीं असा वर मागितला कीं तूं निरंतर ह्या पर्वतावर येऊन रहा. त्याच्या भाषणानें मी बद्ध होऊन वचन पाळलें
पाहिजे ह्मणून ह्या पर्वतीं रहावयास प्राप्त झालों २१ अगस्ति सांगतो—रामा तर तूं ह्या माझ्या आसनावर बैस, कारण मी
आतांच देवकार्यार्थ अन्यत्र जाणार आहे २२ राम ह्मणतो महाराज मी ह्या ठिकाणीं प्राप्त झालों ह्मणून तुह्मी रागाव-
लां असें दिसतें, नाहीं तर हे ब्रह्मन् आतांच हा आश्रम सोडून कां जातां? २३ अगस्ति सांगतात—रामा तुझ्याविषयीं
मला कधींच क्रोध शोभणार नाहीं. मी खरेंच सांगतों कीं मला देवकार्यार्थ गेलेंच पाहिजे २४ महादेव ह्मणतात असें

बोलून त्या ऋषींनें समीपच एक अतिरम्य अशी गुहा तयार केली २५ आणि तींत रामचंद्र, सीता आणि त्यांच्या अग्रभागीं लक्ष्मण अशी संस्थापना केली आपली स्थापना पाहून सीतेला मोठा वितेप वाटला २६ इकडे पुष्कर तीर्थावर ब्रह्मदेवाच्या भाषणानंतर एक मोठेंच कौतुक झालें तें तुला सांगतों २७ दक्षिण दिशेचा स्वामी राजायम जो सर्वांचा संहार करणारा, तो अतिशय क्रुद्ध होऊन, नेत्र लाल करून, भृकुटी चढवून मोठ्या वेगानें २८ पाश आणि दंड हस्तांत घेऊन ब्रह्मदेवापाशीं आला आणि त्याला साष्टांग वंदन करून, पाश आणि दंड त्याच्या पायांवर अर्पण

प्रभो ॥ २४ ॥ महादेवउ० ॥ इत्युक्त्वासऋषिस्तत्रचकारानंददायनीं॥सीतारामसमीपेतगुहांकृत्वाचसंस्थित: ॥ २५ ॥ दंपतीतत्रसंस्थाप्यलक्ष्मणंपुरतोविभो ॥ दृष्ट्वास्वस्थापनांसीताव्रीडितासावभूवह ॥ २६ ॥ अत्रांतरेमहाभागेयवृद्धत्तंपुष्करेतदा ॥ ब्रह्मवाक्यावसानेतुजातंकौतुकमुत्तमं ॥ २७ ॥दक्षिणाधिपति:कालोनियंताविश्वनाशक:॥ सुवेगादागतोकृद्ध:स्फुरभ्द्रूरूर्ध्वदृक्शिर: ॥ २८ ॥ पाशंमुद्रांचदंडंचनिवेद्यब्रह्मणोंतिकम् ॥ पतितश्चरणोपांतेविस्मितोरक्तलोचनः ॥ २९ ॥ यमउ० ॥ अधिकारीप्रेषयस्वत्वस्यमत्वंयस्यवैप्रियं ॥ क्षमोऽहंपापिनांनाथपुण्यानांभक्षमोऽस्म्यहं ॥ ३० ॥ कुत्रातिष्ठंतिपापिष्टा:सुरापाब्रह्महादय: ॥ मुक्तास्तेवैमहापापाद्रामतीर्थावगाहनात् ॥ ३१ ॥ कोदंडयोनारकीलोकेरौरवेयश्चपच्यते ॥ स्नानाद्यास्यंतितेसर्वेरामंतीर्थेसरूपतां ॥ ३२ ॥

करून २९ मोठ्या आवेशानें भाषण बोलता झाला—महाराज मला तुमची सेवा नको. तुम्ही माझ्या जागीं ज्याला आतां यमत्व प्रिय असल असा दुसरा कोणी अधिकारी पाठवा. कारण पाप्याला दंड करण्याचें काम मजकडून होईल. पुण्यवान् असतील त्यांना दंड करण्यास मी समर्थ नाहीं ३० ब्रह्मदेव ह्मणतात—अरे पण सुरापान करणारे ब्रह्महत्या करणारे असे पापीजन तुझ्या शिक्षेस पात्र आहेत कीं नाहीं. यम ह्मणतो, ते आहेत कोठें? सुरापिणारे ब्रह्महत्या करणार इत्यादि जे पातकी होते व जे रौरवादि नरकांत होते व तप्त कढईत तळले जात होते ते सर्व रामतीर्थाच्या स्नान

मात्रानेंच सर्व पातकांपासून मुक्त झाले ३१ आतां कोणाला दंड करावा. सर्व नरकशून्य झालें. जो पहावा तो रामतीर्थी स्नान करून रामसायुज्य पावतो ३२ हे ब्रह्मदेवा आज रामतीर्थाच्या प्रभावानें भूमंडलावर पातक ह्मणून कोठेंच राहिलें नाहीं. आणि ह्याच करितां मी आपला दंड व मुद्राही तुझ्या चरणीं अर्पण केलीं ३३ हें ह्याचें भाषण ऐकून ब्रह्मदेव ह्मणतात—हे यमा तूं दंड घे—मी त्याला उपाय करितो. असें बोलून कांहिंवेळ विचार करून ३४ पुनः हाक मारून भाषण करितात हे यमराजा तूं माझें भाषण श्रवण कर. तें रामतीर्थ शुष्क होण्याची ३५ युक्ति सांगतो ती तूं आतां श्रवण

नास्तिपापंसुरश्रेष्ठरामतीर्थप्रभावत: ॥ एतत्कारणमुद्दिश्यदत्तामुद्रामयाविभो ॥ ३३ ॥ ब्रह्मोवाच ॥ दंडंमुद्रांगृहाणत्वंउपायंचकरोऽम्यहम् ॥ विचिंत्यमनसोपायंयेनतोयंनातिष्ठति ॥ ३४ ॥ आहूयवचनंआहदुर्धर्षचपितामह ॥ मद्वाक्यंकुरुयत्नेनयथाशुष्यतिपुष्करं ॥ ३५ ॥ पुष्यतेयेनतत्कार्यंदंडंमुद्रांगृहाणभो ॥ वर्षाकालेजलंचास्तुशरद्वेमतपल्वलं ॥ ३६ ॥ शैशिरादिनिदाघांतेऋतुत्रयंतिरोदकं ॥ श्रुत्वैतद्वचनंतस्यसूर्यसूनु:प्रजापते: ॥ ३७ ॥ गृहीत्वादंडमुद्रांचहृष्टपुष्टोऽभवत्तदा ॥ ततोब्रह्मास्वयंगत्वारामचंद्रस्यसंनिधिं ॥ ३८ ॥ नत्वानिवेदयामासयमराजस्यकारणात् ॥ ब्रह्मोवाच ॥ प्रेषयस्वमहाराजपुष्करंचस्ववेश्मनि ॥ ३९ ॥ नि:पापोविज्वरोभूत्वायातुयत्रहिमालयं ॥ ब्रह्मणोवचनंश्रुत्वारामआहुयपुष्करं ॥ ४० ॥ ७ ७ ७ ७

कर व आपला दंड घे कारण आतां तुझें कार्य झालें तें तीर्थ वर्षाऋतूंत उदकानें भरलेलें असो ३६ शरदृतु आणि हेमंतऋतु ह्यांत पल्वल—अल्प जलयुक्त असो ३६ आणि शिशिरऋतूपासून साहा महिने ह्मणजे उन्हाळा संपेतों शुष्क असो. हें ब्रह्मदेवाचें भाषण श्रवण करून ३७ यमानें पुनः मोठ्या हर्षानें दंड घेतला आणि हर्षानें तत्काल तो पुष्ट झाला नंतर ब्रह्मदेव स्वतः रामचंद्रापाशीं जाऊन ३८ त्याला नमस्कार करून यमकृत्यार्थ त्याजला विनति करितात, हे रामचंद्रा पुष्कराला आतां स्वस्थानीं पाठीव ३९ त्याला पापरहित होत्साता हिमालयावर जाऊं दे. हें ब्रह्मदेवाचें भाषण

श्रवण करून पुष्कराला हाक मारून ४० त्रिकालज्ञ तो रामचंद्र तो लोकस्थितिसाठीं त्याला आज्ञा करिता झाला—तूं आतां माझ्या आज्ञेनें हिमालयावर जा आणि पुनः मी सांगतों तेव्हां ह्या ठिकाणीं ये ४१ तूं कार्तिकांत ह्या तीर्थीं यावें. आणि माझ्या आज्ञेचें उल्लंघन करून जर तूं त्या वेळीं येणार नाहींस तर ४२ माझ्या क्रोधानें तुझें तीर्थत्व नाहींसें होईल. मग देवही तुझें रक्षण करण्यास समर्थ होणार नाहींत. हें ऐकून पुष्कर भाषण करितें—देवा मी त्या गौतमी (गोदावरी)नदीसारखें मी केवळ सामान्य तळें आहे गौतमीचे ठाईं फक्त बारा वर्षांनीं एकदांच सिंहस्थांत तीर्थत्व यावें असा नि-

**उवाचसर्वकालज्ञोलोकसंस्थितिकारणात् ॥ श्रीरामउवाच ॥ मयाप्रस्थापितोगच्छपुन रेहिमदंतिकं ॥ ४१ ॥ कार्तिकीयेऽत्रकर्तव्यंत्वयातीर्थेनिवासनं ॥ नागमिष्यसिचेदत्र ममाज्ञांहंतुमिच्छसि ॥ ४२ ॥ त्वत्तीर्थत्वंममक्रोधात्भातुंदेवैर्नशक्यते ॥पुष्करउवाच॥ नाहंसागौतमींदेवचास्म्यहंतोयपूरिता ॥ ४३ ॥ मोक्षदातुकृतागंगाद्वादशाद्वात्वयाप्र भो ॥यास्येहंनिश्चितंनाथयदीछासितदात्मना॥४४॥नमस्कृत्यरघुंसोऽथाशिरसाचांतरधी यत ॥ ब्रह्मो० ॥ त्वंनामसदृशंतीर्थंयत्रयत्रचविद्यते ॥ ४५ ॥ तत्रतत्रफलंभूरिसंख्या कर्तुंनशक्यते ॥ त्वयावगाहितंतोयंकेशांतंविश्वरूपिणा ॥ ४६ ॥ अतस्तीर्थप्रभावोऽयं मयावक्तुंनशक्यते ॥ नगंगायमुनागोदानर्मदाशरयूस्तथा ॥४७॥ प्राप्नुवंतीदृशंदिव्यं प्रभावंनसरस्वती ॥ भीमावातुंगभद्रावाकावेरीमलयानिल:॥ ४८ ॥कपिलाकापिलारो**

यम करून तिला दंड केलात तो माहित आहे ४३ तुझी आज्ञा असेल तर मी आपल्या पूर्व स्थानीं जावयास तयार आहे ४४ असें बोलून त्याला नमस्कार करून तत्काल तें अंतर्धान पावलें. ब्रह्मदेव ह्मणतात—रामा ज्या ज्या स्थानीं तुझ्या नामाचें तीर्थ आहे ४५ त्या त्या स्थानीं अत्यंत फल आहे. त्याची गणना करावयास मी समर्थ नाहीं. आणि ह्या तीर्थांत तर तूं साक्षात् विश्वेश्वर अभ्यंग स्नान करिता झालास ४६ ह्मणून ह्या तीर्थाचा महिमा वर्णन करावयास मी समर्थ नाहीं. गंगा, यमुना, गोदा, नर्मदा, शरयु, ४७ पूर्व वाहिनी सरस्वती, भीमा, तुंगभद्रा, कावेरी, मलया, ४८

कापिला, कापिला, रौद्रा, ह्या सर्व नद्या ह्या तीर्थाच्या षोडशांशाचीही तुलना पावत नाहींत जो नदी संगमावर स्नान करून ब्राह्मणाला शंभर गाई दान देईल ४९ त्याचें पुण्य, रामतीर्थाच्या एकवार स्नानाच्या शतांशाचीही योग्यता पावत नाहीं. भार्गवाश्रमीं, नर्मदा आणि सागर ह्यांच्या संगमीं निरंतर वासाचें जें फल तें ५० फल कलियुगीं रामतीर्थीं एक मास वास केल्यानें प्राप्त होतें. तसेंच कर्मपाशा, विपाशा, ह्यांवर वेणीच्या संगमावर एक मास स्नानानें जें फल ५१ तें रामतीर्थीं एकवार स्नानानें प्राप्त होतें. कार्तिक मासांत विधिपूर्वक जो रामतीर्थीं स्नान करितो ५२ त्याचें अंतःकरण

द्राकलान्नार्हतिशोडशी ॥ योनदीसंगमेस्नातिददातिगोशतंद्विजे ॥ ४९ ॥ रामतीर्थम
नुप्राप्यशतांशेनचशोभते ॥ भार्गवस्याश्रमेपुण्येनर्मदासिंधुसंगमे ॥ ५० ॥मासेनैकेन
यत्पुण्यंरामतीर्थेकलौयुगे ॥ कर्मपाशाविपाशांचतथावेण्याचसंगमे ॥ ५१ ॥ मासंपि
त्वाफलंतस्यरामतीर्थेसकृन्नरः ॥ कार्तिकेमासेसंप्राप्तेयःस्नातिविधिवन्नरः ॥ ५२ ॥शु
द्धांतरंभवेत्तस्यरामतीर्थेदिनेदिने ॥ यःस्नातिसर्वतीर्थेषुविष्णुब्रह्माकृतादिषु ॥ ५३ ॥द्वा
दशाब्दफलंतस्यरामतीर्थेकलौयुगे ॥ अश्वमेधादयोयज्ञाकृतास्तेनसुनिश्चितं ॥ ५४ ॥ त
त्फलंलभतेगौरिसत्यंसत्यंनसंशयः ॥ अगस्तिउ० ॥ नकदाचित्त्वयासार्द्धंक्रोधोमेराज
सत्तमं ॥ ५५ ॥ कथितंतेमयापूर्वंदेवकार्यंतवाग्रतः ॥ ईश्वरउ० ॥ इत्युक्त्वासऋषिस्त
त्रचकारनंददायिनी ॥ ५६ ॥ सीतारघुसमासीनौकृतांचसंनिधौगुहां ॥बंधुवर्गश्रीरामं

उत्तरोत्तर शुद्ध होत जातें. जो शिव विष्णु आदींनी केलेल्या अनेक तीर्थावर निरंतर स्नान करितो ५३ त्याला ह्या तीर्थीं द्वादशवर्षांनीं जें फल प्राप्त व्हावयाचें तें कलियुगीं रामतीर्थीं एकवार स्नानानें प्राप्त होतें. त्यानें अश्वमेधादि यज्ञ केल्यासारखे होतात ५४ शंकर सांगतात पार्वति ह्या प्रमाणें त्या तीर्थाचें माहात्म्य आहे ह्यांत संशय नाहीं. इकडे, अगस्ति ऋषी रामाप्रत सांगतात—रामा तुझ्या विषयीं मला कधींच क्रोध यावयाचा नाहीं ५५ देवकार्यार्थ मला जावयाचें आहे हें मी तुला पूर्वींच सांगितलें आहे. असें बोलून त्या ऋषीनें त्या स्थानीं आनंददायक अशी एक गुहा तयार केली

९६ आणि तींत सीता व लक्ष्मण व इतर बंधुवर्ग ह्या सहित रामाच्या मूर्तीची स्थापना केली ९७ त्यांत आपली मूर्ती पाहून ती महासती सीता किंचित् लज्जायुक्त झाली. नंतर रामाच्यापुढें मातुलिंग ( महाळुंग ) फल ठेऊन ऋषि प्रार्थना करितो ९८ हे रामा तुझ्या व सीतेच्या वासानें हें स्थान अभय होईल. शंकर सांगतात, हे प्रिये ह्या स्थानीं रामांनीं एक अश्वमेध यज्ञ केला आणि कर्पूर तीर्थ कोठें आहे ह्मणून विचारलें ९९ अगस्ति सांगतात तें तीर्थ हे लोकत्रयनाथा अद्वितीय तीर्थ आहे तसें कधीं झालें नाहीं व होणार नाहीं ६० नंतर त्या कर्पूरेश्वर नामक तीर्थावर जाऊन सर्व ऋत्विक पुरोहितादि ऋषि मंडळीसह वर्तमान ६१ स्नान करून विधिपूर्वक माध्यान्हिक सर्व क्रिया करून पुनः त्या सर्व ऋषि

स्थापिताचयशस्विनम् ॥ ५७ ॥ सप्तमुद्राकृतासीताव्रीडितासामहासती॥मातुलिंगं करेधृत्वाइदमाहतपोनिधिः ॥ ५८ ॥ हेरामसहजानक्याअभयोऽयंभविष्यति ॥ अश्व मेधःकृतोयज्ञोरामेणसहसाप्रिये ॥ ५९ ॥ कर्पूरतीर्थनामाख्यंपृष्टंतीर्थंतुकुत्रतत् ॥ तम गस्तिरुवाचाथनान्यल्लोकत्रयेविभो ॥ ६० ॥ कर्पूरेश्वरनामाख्यंनभूतंनभविष्यति ॥ त त्रगत्वाथरामोवैस्नानार्थंऋषिभिःसह ॥ ६१ ॥ स्नानंकृत्वाचविधिवत्ततोमध्यान्हिकीं क्रियां ॥ ऋषिभिःसहितोरामआगतोऽयंगिरिंप्रति ॥ ६२ ॥ रामश्चैलक्ष्मणंस्थाप्यतद ग्रेहरिपुंगवं ॥ संनिधौविस्मितातत्रसप्तधातुमयीशुभा ॥ ६३ ॥ तत्स्थानात्कुंभजोया तोदक्षिणाशांतदाप्रिये ॥ नरसिंहंनमस्कृत्यनित्यंतत्रैवसंस्थिताः ॥ ६४ ॥ वाराहंपू र्वदिग्भागेभैरवमुत्तरेविदुः ॥ ततःशक्तिर्महाचंडचितुःशष्ठ्यभिधायिनी ॥ ६५ ॥ सिं दूरेवसतस्तत्रयावत्कालःसमाप्यते ॥ यःकुर्यात्सर्वतीर्थेषुतत्सर्वंसिंदुरेकलौ ॥ ६६ ॥ इ

मंडळासह सिंदूर पर्वतावर प्राप्त झाले ६२ पुनः पूर्ववत्, अगस्त्य ऋषीनें सप्तधातूंच्या, राम, सीता, लक्ष्मण आणि मारुति ह्यांच्या मूर्ती केल्या आणि विधिपूर्वक त्यांची स्थापना करून ६३ आपण दक्षिण दिशेकडे गेला. नंतर रामचंद्रानेंही त्या ऋषीला नमस्कार केला व तो निरंतर त्या पर्वतावर वास करिता झाला ६४ त्या पर्वताच्या पूर्वभागीं वाराह क्षेत्र आहे. उत्तरभागीं भैरव क्षेत्र आहे. शक्ति आणि महाचंडी ह्या, चतुःषष्ठि ६४ योगिनीसह ६९ निरंतर त्या सिंदूर पर्वतावर वास करीत आहेत. ह्मणून संपूर्ण पृथ्वीवरील तीर्थयात्रा केल्यानें जें फल प्राप्त व्हावयाचें तें कलियुगांत सिंदूर पर्वताच्या यात्रेनें प्राप्त होतें ६६ हे पुण्यदर्शने गिरिजे, ह्या प्रमाणें हें सिंदूर पर्वताचें माहात्म्य मी तुला सविस्तर वर्णन केलें, जें

श्रवण केल्यानें मनुष्य सर्व पातकांपासून मुक्त होतो आणि ऋषि, देव, पितर ह्यांच्या ऋणांपासूनही मुक्त होतो ६७ ह्या पर्वत राजाच्या यात्रेपासून इहलोकीं धर्म, अर्थ, काम, हे पुरुषार्थ प्राप्त होऊन अंतीं मोक्षही प्राप्त होतो ६८ ही रम्य कथा जो श्रवण करील त्याला इहलोकीं सर्व सुखें मिळून माझ्या प्रसादानें अंतीं तो रामसायुज्य पावेल ६९ शंकर सांगतात, हे आनंददे पर्वत कन्यके हें सर्व तुला मी वर्णन केलें. हें आजपर्यंत गुप्त होतें परंतु लोकानुग्रहार्थ आज प्रकट केलें ७० ह्याचे जो पठन करील किंवा हें जो श्रवण करील तो परमपद पावेल. माझ्या प्रसादानें त्याला कलिभय कधींच प्राप्त होणार नाहीं ७१ अंबकुंड आणि रामतीर्थ ह्यां तीर्थां सारखें सर्व भूमंडलावर भुक्तिमुक्तिदायक दुसरें कोणतेंच तीर्थ नाहीं

इत्थंतेकथितोदेविसिंदूराख्योमहानघे॥यःश्रुत्वासर्वपापेभ्योमुच्यतेचऋणत्रयात्॥६७॥
चतुर्विधफलंप्राप्यइहलोकेपरत्रच॥भुक्त्वाभोगान्यथाकाममंतेमोक्षमवाप्नुयात्॥६८॥
इतिश्रृण्वन्कथांरम्यांमनुष्योमत्प्रसादतः॥ददातिविपुलान्भोगान्सायुज्यपदमाप्नुयात्
॥ ६९ ॥ इतितेकथितंसर्वंतवाग्रेअद्यनंदिनि ॥ गुप्तंप्रगटितंदेविलोकानांहितकाम्यया
॥ ७० ॥ पठनाच्छ्रवणाद्वापिसयातिपरमंपदं ॥ सर्वनाशभयंतेषांनैवविद्येतशासना
त् ॥ ७१ ॥ अंबकुंडात्परंतीर्थंरामक्षेत्रात्परंतथा ॥ क्षेत्रंनविद्यतेदेविभुक्तिमुक्तिप्रदंशिवं
॥ ७२ ॥ तस्मात्तत्त्वद्विहायान्यन्नगच्छेत्सर्वथानरः ॥ ७३ ॥इतिश्री प०पु०सिं०म०शि
वपार्वतीसंवादेतपंगिरिमा०क्षेत्रस्तुतौषोडषोध्यायःसमाप्तः॥१६॥श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

७२ ह्मणून ज्याला सर्व सौख्य प्राप्त व्हावें अशी इच्छा असेल त्यानें इतर तीर्थीं व इतर क्षेत्रीं न जातां निरंतर ह्याच तीर्थाचा आश्रय करावा, ह्मणजे संपूर्ण अभीष्ट मनोरथ पूर्ण होतील ७३ इतिश्री प० पु० सिं० म० पा० संवादे क्षेत्र स्तुतिर्नाम षोडशोध्यायः ॥ १६ ॥ समाप्तः श्री रामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

हें पुस्तक रामकृष्णहरी जोशी हेड सिग्नलर यांणीं मुकाम नागपूर येथें दंडधारी छापखान्यांत छापविलें.

किंमत १२ बारा आणे.

